


नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**



महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ पुरस्कृत
व प्राज्ञपाठशाला मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ३५ । अंक १२ । सप्टेंबर १९८२
किंमत २ रुपये । वार्षिक वर्गणी १८ रुपये

## निवेदन

दिनांक १ ऑक्टोबर १९८२ पासून 'नवभारत' मासिकाची वार्षिक वर्गणी रु. ३०/– (तीस रुपये) एवढी करण्यात आली आहे आणि फुटकळ अंकाची किंमत रु. ४/– (चार रुपये) करण्यात आली आहे. झपाट्याने वाढणाऱ्या महागाईच्या ह्या काळात 'नवभारत' मासिकामुळे प्राज्ञपाठशाळा मंडळाला येणारा तोटा निदान सह्य असावा ह्यासाठी आवश्यक असलेली ही किमान वाढ आहे. ही गोष्ट ध्यानात धरून मासिकाचे वाचक आणि हितचिंतक 'नवभारता'ला असलेला आपला आश्रय पूर्वीप्रमाणेच चालू ठेवतील असा विश्वास आहे.

संपादक

अध्यक्ष व विश्वस्त
तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

संपादक
मे. पुं. रेगे

---

संपादकीय पत्रव्यवहार :
मे. पुं. रेगे,
संपादक, 'नवभारत' मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई–४१२ ८०३ (जि. सातारा)

---

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
श्री. ग. दिक्षीत,
व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
द्वारा : दि प्राज्ञ प्रेस, वाई–४१२ ८०३.
(जि. सातारा)











अनुक्रमणिका

# नवभारत

सप्टेंबर १९८२

अ नु क्र म



## लेखक-परिचय

★ **वा. वि. मिराशी :** संस्कृतचे सेवानिवृत्त प्राध्यापक; संस्कृत, प्राचीन भारतीय इतिहास व संस्कृतीचे गाढे अभ्यासक व संशोधक, 'कमलासदन' धरमपेठ, नागपूर–४४० ०१०. ★ **यदुनाथ थत्ते :** माजी संपादक, 'साधना' साप्ताहिक; क्षिप्रा, पत्रकारनगर, पुणे–४११ ०१६. ★ **रा. चिं. ढेरे :** धर्म, संस्कृती, साहित्य क्षेत्रांतील एक अग्रगण्य, व्यासंगी संशोधक, ७७, शनिवार पेठ, पुणे–४११ ०३०. ★ **व. त्रिं. चिपळोणकर :** मराठी विश्वकोशातील भौतिकीचे अभ्यागत संपादक, भौतिकीचे निवृत्त प्राध्यापक ( इन्स्टिटयूट ऑफ सायन्स, मुंबई ), फ्लॅट नं. १०६, अभिनव अपार्टमेंट, ९९६ नवी पेठ, पुणे–४११ ०३०. ★ **अशोक चौसाळकर :** अधिव्याख्याता, राज्यशास्त्र विभाग, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर–४१६ ००४. ★ **पंडित टापरे :** किसन वीर महाविद्यालय, वाई येथे मराठीचे प्राध्यापक, वाई–४१२ ८०३. ★ **शिवाजीराव चव्हाण :** किसन वीर महाविद्यालय, वाई येथे मराठीचे प्राध्यापक, वाई–४१२ ८०३.

## संपादकीय

---

### समतेचे मार्ग

सामाजिक समतेचा एक अर्थ असा, की समाजातील कोणत्याही दोन व्यक्तींना, योग्य आणि पुरेसे कारण असल्याशिवाय, भिन्न वागणूक देता कामा नये; सर्व बाबतींत त्यांना समान वागणूक मिळाली पाहिजे. जर दोन व्यक्तींना भिन्न वागणूक देण्यात येत असेल, तर असे करण्याला योग्य आणि पुरेसे कारण आहे हे सिद्ध करण्याची जबाबदारी भेद करणाऱ्यांवर पडते. 'समान वागणूक' ह्या शब्द-प्रयोगाच्या अर्थात अंतर्भूत असलेला एक घटक असा, की सर्व व्यक्तींना स्वतःचे हित साधण्याची समान संधी असली पाहिजे. प्रबोधनाच्या (एन्लायटन्मेन्ट) सामाजिक तत्त्वज्ञानात, त्याच्यावर आधारलेल्या फ्रेंच राज्यक्रांतीमध्ये; जोतिबा फुले यांच्या सामाजिक विचारात समतेचा अर्थ प्रामुख्याने असा लावण्यात येत होता. 'करिअर ओपन टु टॅलेन्ट' – बुद्धिमंतांना सर्व व्यवसायांची दारे खुली असली पाहिजेत – ह्या प्रसिद्ध घोषवाक्यात ह्या विचाराचे सार आले आहे. समाजातील सर्व व्यक्तींचे सामाजिक स्थान समान असले पाहिजे आणि स्वतःचे हित साधण्याची आणि हे हित साधण्यासाठी आवश्यक असलेले ज्ञान व कौशल्ये संपादन करण्याची समान संधी सर्वांना असली पाहिजे असा ह्या घोषवाक्याचा अर्थ आहे.

आज एक गोष्ट स्पष्ट झाली आहे. ज्या समाजाची परंपरेने वरिष्ठ थर आणि कनिष्ठ थर अशी विभागणी झालेली आहे अशा समाजात सर्व व्यक्तींना समान संधी प्रत्यक्षात उपलब्ध करून देणे ही अतिशय दुर्घट गोष्ट आहे. उच्च व्यवसायांत प्रवेश करण्याच्या आणि ह्यासाठी आवश्यक असलेले शिक्षण घेण्याच्या बाबतीत कनिष्ठ थरांतील व्यक्तींवर जी कायद्यांची, संकेतांची, प्रथांची कृत्रिम बंधने असतील ती दूर करणे ही तुलनेने सोपी गोष्ट आहे. पण कनिष्ठ थरांतील कुटुंबांत जन्मलेल्या व्यक्तींना वरिष्ठ थरांतील कुटुंबांत जन्मलेल्या व्यक्तींएवढी संधी प्रत्यक्षात प्राप्त करून देणे हे अतिशय कठीण असे काम आहे. एखादे कुटुंब सुखवस्तू असते. विशिष्ट सामाजिक थरातील कुटुंब म्हणून ते स्वतःला ओळखते आणि ओळखले जाते आणि म्हणून त्याचा एक विशिष्ट सामाजिक दर्जा असतो. त्याच्यात एका पातळीचे सांस्कृतिक, बौद्धिक वातावरण असते. अशा कुटुंबात जन्मलेला आणि वाढलेला मुलगा आपण घेतला आणि अतिशय गरीब, निरक्षर, अडाणी कुटुंबात, परंपरेने ज्याचा सामाजिक दर्जा हीन मानण्यात आला आहे अशा कुटुंबात वाढलेला मुलगा घेतला तर त्या दोघांना खरीखुरी समान संधी मिळू शकणार नाही हे उघड आहे. समजा, शिक्षण सक्तीचे आणि मोफत आहे. समजा, शिक्षणाचा खर्च भागविण्यासाठी गरीब पालकांच्या मुलांना पुरेसे विद्यावेतन देण्यात येते. समजा, ह्याच्या पलीकडे जाऊन, गरीब मुलांनी शिक्षण अर्धवट सोडून रोजगाराला लागू नये म्हणून ती रोजगाराला लागली असती तर त्यांची जेवढी कमाई झाली असती तेवढी रक्कम त्यांच्या पालकांना देण्यात येते. तरीही ह्या दोन मुलांना शिक्षणाची समान संधी आहे असे म्हणता येणार नाही. पहिल्या मुलावर लहानपणापासून बौद्धिक आणि सांस्कृतिक संस्कार होत असतात; विशिष्ट पातळीचे शिक्षण आपण घेतले पाहिजे आणि विशिष्ट दर्जाच्या व्यवसायात आपण प्रवेश केला पाहिजे ही ईर्षा त्याच्या मनात चेतविली जाईल आणि तिचे समाधान जी शिस्त आणि प्रयत्नशीलता आवश्यक असते ती त्याच्या अंगवळणी पडेल असे त्याच्या भोवतालचे वातावरण असते. दुसऱ्या मुलाची एकूण परिस्थिती नेमकी ह्याच्या विरुद्ध असते. ह्या दोन मुलांना शिक्षणाची समान संधी आहे असे म्हणता येणे कठीण आहे.

अनुक्रमणिका

समान संधीचे तत्त्व स्पष्ट करण्यासाठी नेहमी वापरण्यात येणारी एक उपमा म्हणजे शर्यतीची. शर्यत रास्तपणे संघटित करायची तर तिच्यात भाग घेणाऱ्या सर्वांना प्रथम एका सरळ रेषेत आणून उभे केले पाहिजे. त्यानंतर प्रत्येकजण आपापल्या कुवतीनुसार पुढे जाईल किंवा मागे पडेल. म्हणजे शर्यतीचे फलित म्हणून व्यक्तिव्यक्तींमध्ये भेद निर्माण होतील; पण रास्तपणे घेतलेल्या शर्यतीचे परिणाम असल्यामुळे हे भेद रास्त असतील. आता शर्यत रास्तपणे घ्यायची तर सर्व कुटुंबांना सरळ रेषेत आणून ठेवावे लागेल. म्हणजे केवळ आर्थिक पातळीच नव्हे, तर सामाजिक दर्जा आणि सांस्कृतिक पातळी या बाबतीत सर्व कुटुंबे समान असतील अशी व्यवस्था करावी लागेल. आता हे साधायचे तर सर्व व्यवसायांचा सामाजिक दर्जा समान असावा लागेल. सर्व व्यवसायांना मिळणारे वेतन समान असावे लागेल. पण अशी व्यवस्था असली तर शर्यतच असू शकणार नाही हे उघड आहे. कारण पुढे जाण्याची किंवा मागे पडण्याची शक्यता असल्याशिवाय शर्यत असू शकणार नाही. पण सर्व कुटुंबे जर एका रांगेत ठेवायची असतील तर कुणाला पुढे जाऊ देता येणार नाही किंवा मागे पडू देता येणार नाही. कारण जो पुढे जाईल त्याची मुले मागे पडलेल्यांच्या मुलांबरोबर एका रांगेत असणार नाहीत. ती काहीशी त्यांच्या पुढे असतील. रास्तपणे पुढे जाण्याची किंवा मागे पडण्याची शक्यता मोकळी ठेवायची, म्हणजे सर्व व्यक्तींना खरीखुरी समान संधी उपलब्ध करून देऊनही अधिक गुणवत्तेला पारितोषिके लाभतील अशी व्यवस्था करायची तर कुटुंबव्यवस्था नष्ट करावी लागेल. सर्व मुले समान वातावरणात वाढतील अशी व्यवस्था करावी लागेल. प्लेटोने हे जाणले होते.

हा मुद्दा येथेच सोडून दुसऱ्या एका मुद्द्याकडे वळू या. समान संधीच्या ध्येयाचा अर्थ व्यक्तींना द्यावयाची समान संधी असा न घेता जातींना द्यावयाची समान संधी असा घेता येईल. भारतीय समाजव्यवस्था जात ह्या संस्थेवर आधारलेली आहे आणि आपल्या राज्यघटनेने औपचारिक दृष्ट्या ही संस्था सोडून दिली असली आणि समाजजीवनाच्या आधुनिक क्षेत्रात –उद्योग, व्यापार, विज्ञान व तंत्रज्ञान, इ.– ती अधिकाधिक गैरलागू होत असली, ( आणि असल्याचे दिसत असले ) तरी बराच मोठा सामाजिक व्यवहार अजून ह्या संस्थेवरच आधारलेला आहे अशी वस्तुस्थिती आहे. हेगेल-मार्क्सच्या परिभाषेत जात ही जशी इतरांसाठी असते तशी ती स्वतःसाठीही असते. म्हणजे अमूक व्यक्ती अमूक जातीच्या आहेत असे इतर जसे मानतात तसेच ह्या व्यक्ती स्वतःही मानतात, कोण आपल्या जातीचे आहेत आणि कोण नाहीत हे ते ओळखतात आणि एका जातीचे म्हणून आपण सर्व एक आहोत आणि इतरांहून भिन्न आहोत अशी त्यांची जाणीव असते. कामगाराचे कामगारपण औद्योगिक व्यवस्थेतील त्याच्या स्थानावर आणि भूमिकेवर अवलंबून असते. ज्याच्याजवळ इतर काहीच मिळकत नाही आणि केवळ आपली श्रमशक्ती भांडवलदाराला विकून ज्याला जगता येते तो कामगार. सुरवातीला कामगार दुसऱ्या कामगारांकडे आपले प्रतिस्पर्धी, आपली जागा घेऊ शकणारे आपले प्रतिस्पर्धी म्हणून पाहतो. आपण जितकी मजुरी मागू तिच्यापेक्षा कमी मजुरी मागून आपली जागा घेतील अशा व्यक्ती म्हणजे इतर कामगार अशी त्याची त्यांच्याकडे पाहण्याची दृष्टी राहील. औद्योगिक क्षेत्रात कामगाराचे सारखेच स्थान असते आणि सारखीच भूमिका असते म्हणून कामगार असा एक वर्ग वस्तुतः समाजात असतो. आणि इतरांच्या दृष्टीनेही– उदा. भांडवलदारांच्या दृष्टीनेही– तो एक वर्ग असतो. पण वरवर पाहता आपण एकमेकांचे प्रतिस्पर्धी असलो, तरी वस्तुत: आपले हित समान आहे, आपण एकवटलो तर आणि तरच आपण हे समान हित साधू शकू, आपल्याला मिळणारी मजुरी वाढवून घेऊ शकू, ही जाणीव कामगारांत हळूहळू निर्माण होते. मग कामगार-वर्ग हा 'स्वतःसाठी' असलेला एक वर्ग बनतो. उलट, जात ही पहिल्यापासूनच स्वतःसाठी असते. आपल्या जीवनाची सबंध धाटणी, ज्या प्रकारच्या संधी आपल्याला मिळतात त्या आपल्या जातीवर आधारलेल्या असतात हे त्या जातीतील व्यक्ती ओळखतात. म्हणून जातीतील व्यक्तींमध्ये एकतेची जाणीव खोलवर रुजलेली असते.

अनुक्रमणिका

तेव्हा ज्या सामाजिक एककांत (युनिट), समाजाच्या ज्या घटकांत संधीची समानता प्रस्थापित करायची आहे तो एकक किंवा घटक म्हणजे व्यक्ती नसून जात आहे असे भारतीय संदर्भात मानता येईल. आधुनिक जीवनात संधीची समानता म्हणजे शिक्षणाची समानता– ज्ञान आणि कौशल्ये संपादन करण्याची समानता– असते ही गोष्ट ध्यानात घेतली, तर जातिनिहाय समान संधी प्रस्थापित करण्यासाठी शिक्षणाची समान संधी जातिनिहाय प्रस्थापित करावी लागेल. आज औपचारिक दृष्टचा प्राथमिक शिक्षणाची समान संधी असली आणि माध्यमिक व उच्च शिक्षणाची (औपचारिक) समान संधी निर्माण करण्याच्या दृष्टीने काही तजवीज करण्यात आली असली– उदा. आर्थिक दृष्टचा मागास वर्गातील मुलांसाठी मोफत शिक्षण, दलित जाती व जमाती यांमधील विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती, इ.– तरी प्रत्यक्षात समान संधी प्रस्थापित झालेली नाही ही गोष्ट उघड आहे. भरघोस उत्पन्न उत्पन्न मिळवून देणाऱ्या आणि प्रतिष्ठित असलेल्या व्यवसायांत व नोकऱ्यांत प्रवेश मिळवून देणारे शिक्षण घेऊ शकणारे बहुसंख्य विद्यार्थी वरिष्ठ जातींतून आलेले असतात आणि त्यांच्यांत काही तुरळक, अतिशय बुद्धिमान, अतिशय जिद्दीचे आणि अतिशय चांगल्या नशिबाचे असे खालच्या जातींचे विद्यार्थी असतात. जातिनिहाय शिक्षणाची समान संधी प्रस्थापित करण्यासाठी बुद्धिपुरस्सर खास कार्यक्रम आखावा लागेल.

एक तर सर्व मुला-मुलींना चांगल्या गुणवत्तेचे निदान प्राथमिक शिक्षण प्रत्यक्षात मिळते आहे असे पाहावे लागेल किंवा जातिगणिक, त्या, त्या जातीच्या लोकसंख्येच्या प्रमाणात विशिष्ट संख्येच्या मुला-मुलींना चांगले प्राथमिक शिक्षण द्यायची सोय करावी लागेल. आजच्या परिस्थितीत पहिला पर्याय व्यवहार्य नाही. तेव्हा दुसऱ्या पर्यायाची कास धरावी लागेल. तेव्हा शिक्षणाचे सार्वत्रिकीकरण करण्याचा कार्यक्रम चालू असतानाच प्रत्येक जातीच्या संख्येच्या प्रमाणात त्या, त्या जातीच्या हुषार व कष्टाळू मुलांना निवडून त्यांना चांगले प्राथमिक शिक्षण देण्याची व्यवस्था करावी लागेल. शिक्षणाच्या पुढच्या प्रत्येक टप्प्यावर ही व्यवस्था अमलात आणावी लागेल. सर्व अभ्यासक्रमांमध्ये प्रत्येक जातीच्या विद्यार्थ्यांना त्या जातीच्या लोकसंख्येच्या प्रमाणात प्रवेश द्यावा लागेल. अभ्यासक्रमाच्या प्रत्येक टप्प्यावर पुढल्या टप्प्यासाठी किंवा त्याच्यावर आधारलेल्या अन्य अभ्यासक्रमासाठी विद्यार्थ्यांची जी निवड होईल ती जातिगणिक होईल; त्या, त्या जातीच्या विद्यार्थ्यांमधून होईल. स्पर्धा असेल ती विशिष्ट जातीच्या विद्यार्थ्यांमधील अंतर्गत स्पर्धा असेल. शिवाय बौद्धिक संस्कृती, व सामाजिक दर्जाच्या जाणिवेतून निर्माण होणारा आत्मविश्वास आणि ईर्षा मनात मुरलेली असल्याशिवाय शिक्षणाची समान संधी लाभत नाही. तेव्हा प्रतिष्ठित नोकऱ्यांत आणि व्यवसायांत सर्व जातींच्या तरुणतरुणींना लोकसंख्येच्या प्रमाणात जागा राखून उपलब्ध करून द्याव्या लागतील.

ह्याचा अर्थ असा, की सार्वजनिक क्षेत्रातील सर्व पातळ्यांवरचे शिक्षणक्रम आणि नोकऱ्या यांच्यांत प्रत्येक जातीसाठी तिच्या लोकसंख्येच्या प्रमाणात आरक्षित (रिझर्व्हड) जागा ठेवाव्या लागतील. ह्याचा एक परिणाम असा होईल, की आज ज्या प्रगत जाती आहेत त्यांच्यांतील बुद्धिमान विद्यार्थ्यांतील बहुसंख्यांना, त्यांची गुणवत्ता असूनही लाभदायी अभ्यासक्रमांत प्रवेश मिळणार नाही. म्हणजे ह्या विद्यार्थ्यांना पुढे कनिष्ठ नोकऱ्या आणि व्यवसाय यांच्यांत शिरावे लागेल. ह्यातून बराच सामाजिक क्षोभ उद्भवेल. ह्यावरील एक तात्पुरता उपाय असा, की प्रगत जातींतील व्यक्तींनी आपल्या जातींतील विद्यार्थ्यांसाठी लाभदायी अभ्यासक्रम शिकविणाऱ्या खाजगी शिक्षणसंस्था स्वतःच्या खर्चाने चालवाव्या. हा उपाय तात्पुरता ठरेल असे म्हणण्याचे कारण हे, की हे अभ्यासक्रम शिकून बाहेर पडणाऱ्या विद्यार्थ्यांना संबंधित व्यावसायिक जीवनवृत्तींत (करिअर्समध्ये) प्रवेश मिळत राहील असे नाही. उदा. समजा ह्या शिक्षणसंस्थांतून जे अभियंते बाहेर पडतील त्यांना नोकऱ्या मिळायच्या तर पुरेसे उद्योगधंदे खाजगी क्षेत्रांत असावे लागतील. पण एक तर खाजगी उद्योगांनाही

अनुक्रमणिका

सरकारी नियंत्रणाखाली असलेले बरेच भांडवल लागते. ह्या अर्थाने खाजगी उद्योगही निम-सार्वजनिक ठरतात आणि म्हणून सरकारी नियंत्रणाखाली येतात. तेव्हा ह्या उद्योगांतही सार्वजनिक शिक्षण-संस्थांतून शिकून बाहेर पडलेल्या विद्यार्थ्यांसाठी जातिनिहाय आरक्षित नोकऱ्या देण्यात आल्या पाहिजेत असा आग्रह सरकार धरू शकेल. शिवाय खाजगी उद्योगांचे क्षेत्र केवढे राहील हे सरकारी धोरणावर अवलंबून राहील.

तेव्हा उच्च व्यवसायांत सर्व जातींना त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात स्थान देण्याच्या धोरणाचा एक अटळ परिणाम असा की, काही काळानंतर प्रत्येक प्रगत जातीमध्ये काही मूठभर उच्च व्यवसायांत असलेली मंडळी, काही मध्यम प्रतीच्या व्यवसायांत असलेली मंडळी आणि बरीच कनिष्ठ व्यवसायांत असलेली मंडळी आढळून येतील. प्रत्येक प्रगत जातीमध्ये आर्थिक-सांस्कृतिक उतरंड निर्माण होईल. आजही काही प्रमाणात ही गोष्ट आढळून येते. उच्च व्यवसायांत असलेल्या बहुसंख्य व्यक्ती प्रगत जातींमधील असल्या तरी प्रगत जातींतील बहुसंख्य व्यक्ती उच्च व्यवसायांत नाहीत. पण सामान्यपणे एका विशिष्ट आर्थिक-सामाजिक-सांस्कृतिक रेषेखाली प्रगत जातींमधील व्यक्ती आढळून येत नाहीत. मध्यम दर्जाच्या व्यवसायांखाली प्रगत जातींमधील व्यक्ती क्वचितच आढळतात. ही स्थिती पुढे फार काळ टिकणार नाही. कारण मध्यम दर्जाच्या व्यवसायांवर इतर जातींचे त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात दडपण येईल. हे भवितव्य दिसत असल्यामुळे प्रगत जातींना हे धोरण मान्य होणे अशक्यप्राय आहे. ते रेटण्यासाठी सर्वाधिकारशाही राज्यव्यवस्था निर्माण करावी लागेल.

ह्या धोरणामुळे राष्ट्रीय कार्यक्षमतेची काही काळ हानी होईल. कारण आज जास्तीत जास्त गुणवत्ता अंगी असलेल्या अनेक व्यक्तींच्या ऐवजी कमी गुणवत्तेच्या व्यक्तींना जबाबदारीची पदे द्यावी लागतील. सामाजिक व्यवहाराच्या कित्येक क्षेत्रांमध्ये ह्यामुळे होणारी हानी चढत्या भाजणीची असेल. उदा. अध्यापनाच्या क्षेत्रात वाईट शिक्षकांमुळे कमी गुणवत्तेचे विद्यार्थी तयार होतील आणि ह्या कमकुवत विद्यार्थ्यांमुळे इतर सामाजिक क्षेत्रांत (तुलनेने) जी हानी होईल ती होईलच; पण अधिक वाईट अध्यापक निर्माण होऊन पुढे अधिकच वाईट विद्यार्थी तयार होतील. वैज्ञानिक संशोधन आणि तंत्रज्ञान या क्षेत्रात आज एवढ्या वेगाने प्रगती होत आहे, की राष्ट्रीय हिताच्या दृष्टीने अधिकांत अधिक गुणवत्तेच्या अधिकांत अधिक व्यक्तींना तयार करून ह्या क्षेत्रात प्रविष्ट करणे अत्यावश्यक झाले आहे. ही गोष्ट साधायची तर कुठेही आरक्षित जागा ठेवता येणार नाही. अर्थात ही हानी तात्पुरती– दोन एक पिढ्या जाईपर्यंत होणारी–असेल. त्यानंतर चांगल्या गुणवत्तेचे लोक सर्व जातींमधून उपलब्ध होतील.

ह्या धोरणामुळे जाती नव्हेच तर उपजातीही अधिक चिवट होतील. कारण निवड जातींमधून न होता उपजातींमधून केली तर उपजातींतील कोणत्याही विद्यार्थ्याला केवळ आपल्या उपजातीतील स्पर्धकांना तोंड द्यावे लागते आणि त्याची निवडले जाण्याची संभाव्यता वाढते.

आणखी एक शक्यता अशी आहे, की दोन पिढ्यांनंतर प्रत्येक जातींमधून उच्च व्यवसायांत शिरलेल्या ज्या व्यक्ती आणि कुटुंबे आहेत त्यांचा मिळून एक सामाजिक–सांस्कृतिक दृष्ट्या एक-जिनसी असलेला वर्ग तयार होईल आणि तो ह्या धोरणाला विरोध करील.

आणि हे धोरण निर्धाराने अमलात आणणारा जो राजकीय पक्ष किंवा गट असेल त्यातील कुटुंबांची मिळून दोन पिढ्यांनंतर एक प्रगत जात होईल.

अनुक्रमणिका

# गुप्त सम्राट द्वितीय चन्द्रगुप्ताचा वानप्रस्थाश्रम !

वा. वि. मिराशी

आपल्या वैदिक धर्मात त्रैवर्णिकांकरिता ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ, आणि संन्यासी असे चार आश्रम विहित आहेत. त्यांपैकी वानप्रस्थाश्रम केव्हा घ्यायचा याविषयी मनुस्मृतीत (६.२) पुढील श्लोक आला आहे —

गृहस्थस्तु यदा पश्येद्वलीपलितमात्मनः ।
अपत्यस्यैव चापत्यं तदारण्यं समाश्रयेत् ॥

'गृहस्थाश्रमी जेव्हा पाहील, की आपल्या अंगावर सुरकुत्या आल्या आहेत, आपले केस पिकले आहेत आणि आपल्या मुलाला अपत्य झाले आहे तेव्हा त्याने (वानप्रस्थाश्रमाकरिता) अरण्यात जावे.'

पूर्वोक्त चार आश्रमांपैकी पहिल्या दोनचे पालन सामान्यतः केले जात असे, पण वानप्रस्थाश्रमाचा स्वीकार क्वचितच केला जात असावा. राजेलोकांपैकी त्याचा अवलंब करणारे फारच विरळा असावे. कालिदासाने 'रघुवंशा'त दिलीप, रघु, सुदर्शन इत्यादी राजांनी तो स्वीकारल्याचा निर्देश केला आहे. ही झाली पौराणिक राजांची कथा. ऐतिहासिक कालात कोणी राजाने वनात जाऊन आणि तेथे कंदमूलफलांवर निर्वाह करून आपली नित्यनैमित्तिक धर्मकृत्ये करीत, आत्मानात्मविचारात आणि योगाभ्यासात कालक्रमणा केली असल्याचे माहीत नाही. पण वानप्रस्थाश्रमाचे ऐतिहासिक कालातील एक उदाहरण डॉ. देवदत्त रामकृष्ण भांडारकर यांनी नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या आपल्या Inscriptions of the Early Gupta Kings (आद्य गुप्त राजांचे कोरीव लेख) या ग्रंथात दाखविले आहे. त्याची चर्चा प्रस्तुत लेखात करावयाची आहे.

या ग्रंथाचा मोठा इतिहास आहे. आता प्रसिद्ध झालेली ही त्याची दुसरी आवृत्ती. पहिली आवृत्ती सुमारे शंभर वर्षांपूर्वी, सन १८८८ मध्ये, कॉर्पस इन्स्क्रिप्शनम् इंडिकॅरम (भारतीय उत्कीर्णलेखसंग्रह) या विख्यात ग्रंथमालेचा तिसरा खंड म्हणून प्रकाशित झाली होती. ती गेली पन्नास-साठ वर्षे अत्यंत दुर्मिळ झाली होती. त्या ग्रंथाची सुधारून आणि मध्यंतरीच्या काळात प्राप्त झालेले कोरीव लेख घालून दुसरी आवृत्ती काढण्याचे काम सुमारे पन्नास वर्षांपूर्वी, सन १९३५ मध्ये, डॉ. देवदत्तपंत भांडारकर यांच्याकडे सोपविले होते. ते त्यांनी १५ वर्षे परिश्रम करून सन १९५० मध्ये, आपल्या निधनापूर्वी थोडेच दिवस, पूर्ण केले आणि त्याचे हस्तलिखित भारतीय पुरातत्त्वखात्याच्या स्वाधीन केले. छपाईपूर्वी त्यात थोडीबहुत ठाकठीक करणे अवश्य असल्यामुळे ते दीर्घ काळ अप्रकाशित राहिले होते. आता डॉ. बहादूरचंद्र छाबडा आणि डॉ. गोविंद स्वामिराव गै यांनी ते काम हाती घेऊन नुकतीच त्या ग्रंथाची ही दुसरी आवृत्ती प्रकाशित केली आहे. डॉ. भांडारकरांनी पहिल्या आवृत्तीतील गुप्तोत्तरकालीन लेख गाळून आणि नंतर मिळालेले गुप्तांचे लेख घालून ही दुसरी आवृत्ती अद्ययावत केली आहे.

या नवीन आवृत्तीत डॉ. भांडारकरांनी प्रस्तावनेत प्रथमच गुप्तांचा राजकीय इतिहास, तत्कालीन राज्यपद्धती, सामाजिक, धार्मिक आणि साहित्यिक इतिहास आणि इतर काही महत्त्वाचे प्रश्न यांची सविस्तर चर्चा केली आहे. डॉ. भांडारकर हे पट्टीचे प्राचीन भारतीयेतिहासज्ञ आणि संशोधक होते. त्यांनी अनेक ठिकाणी आपली गुप्तेतिहासविषयक नवीन मते प्रतिपादिली आहेत. त्यांतील काही धक्कादायक आणि भ्रामक आहेत. सत्यान्वेषणार्थ त्यांचे चिकित्सक परीक्षण केले पाहिजे. त्यांच्या तशा एका विधानाची चर्चा प्रस्तुत लेखात करावयाची आहे.



अनुक्रमणिका

गुप्त सम्राट द्वितीय चन्द्रगुप्त हा गुप्त वंशातील अत्यंत विख्यात राजा होऊन गेला. गेल्या शे-दीडशे वर्षांतील संशोधनाने त्याच्याविषयी बरीच माहिती आता उपलब्ध झाली आहे. त्याचे साम्राज्य उत्तर भारताच्या विस्तृत प्रदेशावर पसरले होते. दक्षिण भारतातही त्याचा बराच वचक असावा. त्याने विक्रमादित्य ही पदवी धारण केली होती. कविकुलगुरू कालिदास हा त्याच्याच दरबारी होता वगैरे माहिती आता उपलब्ध झाली आहे. पण त्याने वानप्रस्थाश्रम स्वीकारण्याकरिता दूरच्या पंजाब प्रांतात जाऊन काही काळ तेथे वास्तव्य केले होते ही माहिती मात्र नवीन आणि धक्कादायक आहे. तिच्या प्रमाणांचे परीक्षण केले पाहिजे.

डॉ. भांडारकरांचे पूर्वोक्त मत पुढील प्रमाणांवर आधारित आहे–

दिल्लीच्या दक्षिणेस ९ मैलांवर मेहरौली नामक गावात कुतुबमिनारजवळ एका सखल जागेत एक गोल लोहस्तंभ उभा आहे. तो खालपासून वरपर्यंत थोडा निमुळता होत गेला आहे. त्याचा खालचा व्यास १६ इंच आणि वरचा १२ इंच असून त्याची उंची २३ फूट, ८ इंच आहे. त्यावर खालील लेख कोरला आहे[१]–

ओळ १. यस्योद्वर्त्तयतः प्रतीपमुरसा शत्रून्समेत्यागतान्वङ्गेष्वाहववर्त्तिनोभिलिखिता खड्गेन कीर्त्तिर्भुजे [ । * ]

२. तीर्त्वा सप्त मुखानि येन समरे सिन्धोर्ज्जिता वाह्लिका यस्याद्याप्यधिवास्यते जलनिधिर्व्वीर्य्यानिलैर्द्दक्षिणः [ ।। १ ।। * ]

३. खिन्नस्येव विसृज्य गां नरपतेर्ग्गामाश्रितस्येतरां मूर्त्या कर्म्मजितावनिं गतवतः कीर्त्या स्थितस्य क्षितौ [ । * ]

४. शान्तस्येव महावने हुतभुजो यस्य प्रतापो महान्नाद्याप्युत्सृजति प्रणाशितरिपोर्य्यत्नस्य शेषः क्षितिम [ ।। २ ।। * ]

५. प्राप्तेन स्वभुजार्ज्जितञ्च सुचिरञ्चैकाधिराज्यं क्षितौ चन्द्राह्वेन समग्रचन्द्रसदृशीं वक्त्रश्रियं बिभ्रता [ । * ]

६ तेनायं प्रणिधाय भूमिपतिना धा ( भा ) वेन विष्णो ( ष्णौ ) मतिं प्रान्शुर्विष्णुपदे गिरौ भगवतो विष्णोर्ध्वजः स्थापितः [ ।। ३ ।। * ]

या तीन श्लोकांचा फ्लीटने केलेला आणि आतापर्यंत मान्य झालेला अनुवाद येणेप्रमाणे––

(१) वंग देशामध्ये जमून चालून आलेल्या शत्रूंना आपल्या छातीने मागे सारत असता ज्याच्या बाहूवर (शत्रूंच्या) खड्गाने कीर्ती कोरली गेली होती, ज्याने सिन्धुनदीची सात(ही) मुखे (तिला मिळणाऱ्या नद्या) पार करून समरांगणात बाह्लीकांना जिंकले होते; ज्याच्या प्रतापरूपी वायूने दक्षिण सागर अद्यापि सुगन्धित झाला आहे;

(२) जो जणू काय श्रान्त झाल्यामुळे एका गोचा (पृथ्वीचा) त्याग करून दुसऱ्या गोचा (स्वर्गाचा) आश्रय घेता झाला; जो आपल्या कर्मानि (पुण्याईने) प्राप्त झालेल्या (स्वर्गरूपी) स्थानास स्वस्वरूपाने गेला असून (केवळ) कीर्तीने पृथ्वीवर अद्यापि विद्यमान आहे; ज्याप्रमाणे एखाद्या मोठ्या अरण्यात दावाग्नि शांत झाला तरी त्याची उष्णता तेथे काही काल नष्ट होत नाही, त्याप्रमाणे शत्रूचे निर्दालन करणाऱ्या ज्याचा अवशिष्ट महाप्रताप अद्यापि पृथ्वीवरून नाहीसा होत नाही;

(३) ज्याने आपल्या बाहूंनी दीर्घकालपर्यंत पृथ्वीचे साम्राज्य मिळविले होते त्या पूर्ण चन्द्राप्रमाणे मुखश्री असलेल्या, चन्द्र नामक राजाने भक्तियुक्त अन्तःकरणाने विष्णुपद पर्वतावर भगवान विष्णूचा उंच असा(हा) ध्वजस्तंभ उभारला आहे.

या लेखात उल्लेखिलेल्या काही बाबी वादग्रस्त होऊन त्यांवर अनेक संशोधकांनी भिन्न भिन्न मते प्रतिपादिली आहेत. त्यांची चर्चा आता करू.

वरील तिसऱ्या श्लोकात हा स्तंभ विष्णुपद गिरीवर उभारला आहे असे म्हटले आहे. सध्या तो ज्या ठिकाणी आहे ते स्थान सखल असून त्याला कोणत्याही अर्थाने गिरि (पर्वत) म्हणणे योग्य होणार नाही. तेव्हा दिल्ली येथील दोन अशोक स्तंभांप्रमाणे हा लोहस्तंभ दुसरीकडून आणून मेहरौली येथे उभा केला असावा. या स्तंभाविषयी तशी परंपरागत समजूतही आहे. असे म्हणतात, की हा स्तंभ तोमर राजवंशाचा मूळपुरुष अनंगपाल याने ख्रिस्तोत्तर आठव्या शतकाच्या आरंभी दिल्लीस आणला होता. पण तसे असल्यास जेथून तो आणला ते स्थान निश्चित केले पाहिजे. सुदैवाने या बाबतीत 'वाल्मीकि रामायणा'चा पुरावा उपलब्ध आहे.

अनुक्रमणिका

'रामायणा'त असे म्हटले आहे की राम, लक्ष्मण व सीता वनवासाकरिता निघून गेल्यावर दशरथ राजा मृत्यू पावला. तेव्हा आपल्या आजोळी (केकय देशात) गेलेल्या भरताला आणण्याकरिता वसिष्ठ ऋषींनी केकय देशाची राजधानी गिरिव्रज येथे जासूद पाठविले. त्यांच्या मार्गाचे 'रामायणा'तील वर्णन पाहा[२]–

ययुर्मध्येन बाह्लीकान् सुदामानंच पर्वतम् ।
विष्णोः पदं प्रेक्षमाणा विपाशां चापि शाल्मलीम् ।

(ते जासूद बाह्लीक देश आणि सुदामा पर्वत याच्या मधून जाऊन विष्णुपद आणि विपाशा व शाल्मली या नद्या पाहत पाहत गिरिव्रजाला गेले.)

या श्लोकात मेहरौली लेखातल्याप्रमाणे विष्णुपद आणि बाह्लीक देश या दोहोंचाही निर्देश आहे. म्हणून विष्णुपदाचे स्थान ठरविण्यास हा श्लोक अत्यंत महत्त्वाचा आहे. विष्णुपद हा पर्वत पंजाबात गुरुदास आणि कांगरा जिल्ह्याच्या सीमेजवळ विपाशा (बिआस्) नदीच्या गेचक्याला लागून असला पाहिजे.[३]

विष्णुपद गिरीचे स्थान निश्चित झाले. आता ज्या चन्द्र नृपतीने हा स्तंभ उभारला तो कोण हा प्रश्न सोडविला पाहिजे. यावरही विविध मते व्यक्त झाली आहेत. फ्लीटच्या मते तो 'महाराजाधिराज' ही पदवी गुप्त वंशात प्रथम धारण करणारा प्रथम चन्द्रगुप्त असावा. पण त्याच्या काळी गुप्तांचे राज्य प्रस्तुत लेखात वर्णिल्याप्रमाणे विस्तृत झाले नव्हते. तसेच त्याची कारकीर्द दीर्घकाळ चालली नव्हती. तेव्हा तो त्या लेखात वर्णिलेला चन्द्र नृपति असणे शक्य नाही. दुसरे काही संशोधक हा चन्द्र नृपति म्हणजे बंगालातील सुसुनिया येथील प्रस्तर लेखात उल्लेखिलेला चन्द्रवर्मन् असावा असे म्हणतात. पण तोही लहानसाच राजा होता. त्यालाही मेहरौली लेखातील वर्णन लागू पडत नाही. तिसरे मत तो चन्द्र नृपति गुप्त वंशातील विख्यात राजा द्वितीय चन्द्रगुप्त विक्रमादित्य होय असे आहे. ते मात्र स्वीकार्य आहे. कारण त्या स्तंभलेखातील वर्णन त्याला बरोबर जुळते. कसे ते पाहा :

या चन्द्रगुप्ताचा पिता समुद्रगुप्त याने बंगाल देश जिंकला होता खरा; कारण त्याच्या प्रयाग येथील प्रशस्तीत त्याने समतट देश पादाक्रांत केल्याचा निर्देश आहे. समतट म्हणजे बंगालच्या मैमनसिंग, डाक्का, सिलहेट, टिप्पेरा इत्यादी जिल्ह्यांचा प्रदेश होय. पण तसे असले तरी समुद्रगुप्ताच्या अधिपतींनी द्वितीय चन्द्रगुप्ताचे आधिपत्य झुगारून देण्याचा प्रयत्न केला असणे असंभवनीय नाही. शिवाय, या चन्द्रगुप्ताचे साम्राज्य उत्तर भारताच्या विशाल भागावर पसरले होते यात संशय नाही. दक्षिणेतील विदर्भाचे वाकाटक, कुन्तलाचे राष्ट्रकूट इत्यादी राजांशी त्याचे संबंध मैत्रीचे आणि वैवाहिक नात्यांनी दृढ झालेले असे होते. तेव्हा 'त्याच्या महाप्रतापरूपी वायूने दक्षिण सागर अद्यापि सुगन्धित झाला आहे' हे मेहरौली लेखातील वर्णन त्याला ठीक जुळते. त्याने पंजाबवर स्वारी करून नेत्रदीपक विजय मिळविला असणे असंभवनीय नाही. त्याच्या त्या स्वारीला तसेच कारणही झाले होते असे दाखविता येते.

अलीकडील चाळीस-पन्नास वर्षांच्या संशोधनाने सिद्ध झाले आहे, की समुद्रगुप्तानंतर द्वितीय चन्द्रगुप्त गादीवर आला नव्हता तर त्याचा वडील मुलगा रामगुप्त याला ती गादी मिळाली होती. नंतर लौकरच रामगुप्ताने आपला पिता समुद्रगुप्त याचे अनुकरण करून तत्कालीन कुषाण नृपतीच्या पंजाब प्रदेशावर स्वारी केली. त्याने आपल्या बरोबर आपला धाकटा भाऊ चन्द्रगुप्त आणि राणी ध्रुवदेवी किंवा ध्रुवस्वामिनी हिलाही घेतले होते. या स्वारीत रामगुप्ताचा सपशेल पराभव झाला आणि स्वतःला आणि स्वतःच्या सैन्याला परत जाऊ देण्याकरिता स्वतःची राणी शत्रूकडे पाठविण्याची अत्यंत अपमानकारक अट कबूल करावी लागली. पण चन्द्रगुप्ताला ही नामुष्कीची अट मुळीच मान्य होईना. त्याने स्वतः ध्रुवस्वामिनीचा वेष घेऊन आणि काही शूर व विश्वासू सैनिकांस तिच्या दासींचा वेष देऊन कुषाणांच्या छावणीत प्रवेश केला आणि योग्य संधी साधून त्यांनी शत्रूला व त्याच्या प्रमुख अधिकाऱ्यांना कंठस्नान घातले आणि रामगुप्ताची आणि त्याच्या सैन्याची या बिकट प्रसंगातून सुटका केली. पुढे त्या दोन भावांत वितुष्ट उद्भवून रामगुप्त मारला गेला आणि चन्द्रगुप्त गादीवर आला.

अनुक्रमणिका

वरील सकृद्दर्शनी असंभाव्य वाटणारी हकीकत अलीकडे प्राप्त झालेल्या अव्वल दर्जाच्या पुराव्यावरून आता सिद्ध झाली आहे.

गादीवर आल्यावर चन्द्रगुप्ताने पंजाबच्या कुषाण शत्रूवर सूड घेण्याचे ठरविले असल्यास नवल नाही. त्यानें त्या देशावर स्वारी करून नेत्रदीपक विजय मिळविला. त्याचे स्मारक म्हणून विष्णुपद पर्वतावर हा लोहस्तंभ उभारला असावा. त्यावरील लेख मात्र त्याच्या निधनानंतर त्या स्तंभावर कोरलेला दिसतो. म्हणून त्यात त्याच्या कारकीर्दीतील अनेक घटनांचा निर्देश आहे.

याप्रमाणे या मेहरौली लेखाची समाधानकारक उपपत्ती लावता येते. ती आतापर्यंत सर्व संशोधकांना मान्य झाली होती. पण डॉ. देवदत्तपंत भांडारकरांनी त्याची निराळीच उपपत्ती लावली आहे. तिचे आता चिकित्सक परीक्षण करू.

डॉ. भांडारकरांनी पुढील श्लोकार्धाचा निराळाच अर्थ लावून त्यावर आपली उपपत्ती आधारली आहे–

खिन्नस्येव विसृज्य गां नरपतेर्गामाश्रितस्येतरां मूर्त्या-
कर्मजितावर्निं गतवतः कीर्त्या स्थितस्य क्षितौ ।।

या श्लोकार्धाचा डॉ. भांडारकरांनी केलेला अर्थ येणेप्रमाणे–

जणू काय खिन्न झाल्याप्रमाणे ज्या चन्द्र राजाने एका गोचा ( जिंकलेल्या पृथ्वीवरील प्रदेशाचा ) त्याग करून दुसऱ्या गोचा ( विष्णुपदाचा ) आश्रय केला होता; जो ( धार्मिक ) कृत्याकरिता ( वानप्रस्थाश्रमाकरिता )[४] जिंकलेल्या प्रदेशात स्वदेहाने ( स्वतः ) गेला होता आणि त्या प्रदेशात (क्षितौ) कीर्तिरूपाने राहिला होता ( त्या चन्द्रनृपतीने हा स्तंभ उभारला.).

डॉ. भांडारकरांनी केलेला हा अर्थ अत्यंत ओढाताणीचा असून अग्राह्य आहे. ' खिन्नस्येव ' इत्यादी श्लोकार्धात ' गो ' शब्द दोनदा आला आहे. त्याचा अर्थ ' लोक ' किंवा ' भुवन ' असा आहे. चन्द्रनृपतीने जणू श्रान्त झाल्याप्रमाणे एका ' गो 'चा म्हणजे या भूलोकाचा त्याग करून दुसऱ्या ' गो 'चा म्हणजे स्वर्गाचा आश्रय केला असा त्याच्या पहिल्या पदाचा अर्थ आहे. तेथे ' पृथ्वीचा त्याग करून विष्णुपदाचा आश्रय केला ' असा अर्थ करणे हास्यास्पद होईल. कारण विष्णुपद पर्वतही पृथ्वीवरच आहे. तसेच तो वानप्रस्थाश्रमाकरिता विष्णुपदगिरीला गेला हे म्हणणेही तसेच हास्यास्पद आहे. येथे वानप्रस्थाश्रमाचा सूचक असा एकही शब्द नाही. शिवाय, वानप्रस्थाश्रमाकरिता पाटलिपुत्राहून ( किंवा उज्जयिनीहून[५] ) पंजाबासारख्या दूरच्या प्रदेशात जाण्याची मुळीच जरूरी नाही. त्याला तो आश्रम मगधात (किंवा माळव्यात) सहज घेता आला असता.

पुढे ' मूर्त्या कर्मजितावर्निं गतवतः कीर्त्या स्थितस्य क्षितौ ' या पादातील चन्द्र नृपतीच्या दोन क्रियांमधील भेद सुस्पष्ट आहे. चन्द्र नृपति स्वस्वरूपाने स्वर्गाला गेला, पण स्वकीर्तीने तो पृथ्वीवर विद्यमान आहे असे येथे विवक्षित आहे. ' तो वानप्रस्थाश्रमाकरिता (कर्मणे) जिंकलेल्या प्रदेशात गेला आणि तेथे कीर्तिरूपाने राहिला ' असे म्हणण्यात त्या पदाचे सर्व स्वारस्य नष्ट होत आहे. थोर मनुष्य निधन पावून परलोकी जातो, तेव्हा त्याचे वर्णन ' पृथ्वीवर कीर्तिरूपाने राहिलेला ' असे करण्याचा प्रघात आहे. त्याला अनुसरून येथील शब्दयोजना केली आहे. अशी अनेक स्थले संस्कृत वाङ्मयातून दाखविता येतील.[६] तेव्हा मेहरौली स्तंभावरील लेख कोरला तेव्हा चन्द्र नृपति निधन पावला होता याविषयी मुळीच संशय राहू नये. डॉ. भांडारकरांनी केलेला या श्लोकाचा अर्थ सर्वस्वी चुकीचा आहे.

डॉ. भांडारकर चांगले संस्कृतज्ञ होते. त्यांनी या श्लोकाचा असा विपरीत अर्थ कसा केला असा प्रश्न येथे उपस्थित होतो. त्याचे उत्तर ' मूर्त्या कर्मजितावर्निं गतवतः ' या शब्दसमूहातील ' मूर्त्या ' पदाने त्यांना चकविले हे होय. या लेखावरील एका तळटीपेत ते म्हणतात,[७] ' ' मूर्त्या ' शब्दावरून असे स्पष्ट दिसते, की जेव्हा हा स्तंभ उभारला, तेव्हा चन्द्र नृपति या जगात म्हणजे विष्णुपद येथे जिवंत होता आणि तोही वानप्रस्थरूपाने.' डॉ. भांडारकरांचे म्हणणे असे की, मनुष्य मृत्यू पावतो तेव्हा तो मूर्तिहीन ( शरीरहीन ) होतो. चन्द्र नृपति विष्णुपदगिरीवर मूर्तिरूपाने ( सशरीर ) विद्यमान होता. तेव्हा तो त्या काळी जिवंत असलाच पाहिजे.' येथे डॉ. भांडारकरांची दिशाभूल होत आहे. ' मूर्त्या कर्मजितावर्निं गतवतः ' या पादामध्ये विष्णु-

पदाचा संबंध नाही हे मागे दाखविले आहे. चन्द्र नृपति कर्म जितावनीला ( कर्माने, स्वतःच्या पुण्याईने, जिंकलेल्या लोकाला अर्थात स्वर्गाला ) स्वमूर्तिरूपाने गेला होता. याचा अर्थ त्याला दिव्य शरीर प्राप्त होऊन तो त्या रूपाने स्वर्गास गेला, असा आहे. पुण्यवान मनुष्य मृत्यू पावतो तेव्हा तो मूर्तिहीन ( शरीरहीन ) होत नाही. त्याचे पंचभूतात्मक पार्थिवशरीर नष्ट होते खरे, पण त्याला दुसरे ( दिव्य ) शरीर प्राप्त होते ही कल्पना संस्कृत ग्रंथांत अनेक ठिकाणी आढळते. उदाहरणार्थ, ' रघुवंशा 'तील इन्दुमती निधनानन्तर शोकाने देहत्याग केलेल्या अज राजाचे पुढील वर्णन पाहा—

तीर्थे तोयव्यतिकरभवे जह्नुकन्यासरय्वोर्देहत्यागादमरगणनालेख्यमासाद्य सद्यः ।

पूर्वाकाराधिकतररुचा सङ्गतः कान्तयासौ लीलागारेष्वरमत पुनर्नन्दनाभ्यन्तरेषु ॥

( इन्दुमतीच्या निधनानंतर शोकाने अज राजाने गंगा आणि सरयू यांच्या संगमात देहत्याग केला. तेव्हा लागलीच त्याची देवांमध्ये गणना होऊन त्याला पूर्वीपेक्षाही अधिक सुंदर दिसणाऱ्या पत्नीची भेट झाली आणि ती तिच्यासह नन्दनवनाच्या लीलागृहात पुनः रममाण झाला. )

निधनानंतर अज आणि इन्दुमती हे मूर्तिहीन झाले नसून त्यांना दिव्य रूप प्राप्त झाले असे कालिदासाने वरील श्लोकात वर्णिले आहे. तेव्हा ' मूर्त्या कर्मजितावनिं गतवतः ' या शब्दसमूहाचा अर्थ ' आपल्या पुण्यकर्माने प्राप्त झालेल्या स्थानास ( स्वर्गास ) गेलेला ' असाच केला पाहिजे. त्याच्या पुढील ' कीर्त्या स्थितस्य क्षितौ ' याने पूर्वोक्त अर्थाला पुष्टी मिळत आहे. थोर मनुष्य जेव्हा निधन पावून परलोकी जातो तेव्हा त्याचे वर्णन ' पृथ्वीवर कीर्तिरूपाने राहिलेला ' असे करण्याचा प्रघात आहे. त्याचा व्यङ्ग्यार्थ तो आता मानवी देहाने पृथ्वीवर विद्यमान नाही असा असतो. ' मूर्त्या कर्मजितावनिं गतवतः कीर्त्या स्थितस्य क्षितौ ' या पादात चन्द्र नृपति ' ( दिव्य ) देहाने स्वतःच्या पुण्यकृत्यांनी स्वर्गास गेला आहे ' आणि ' पृथ्वीवर फक्त त्याची कीर्ती राहिली आहे ' अशी दोन्ही विधाने सुस्पष्ट रीतीने केली आहेत. त्यात चन्द्र नृपति वानप्रस्थाश्रमाकरिता विष्णुपद गिरीवर गेला आणि तेथे त्याने दीर्घकाल वास्तव्य केले असे मानण्यास यत्किंचितही आधार नाही.[८]

**संदर्भ टीपा—**

१. कॉर्पस इन्स्क्रिप्शनम् इंडिकॅरम् (कॉ. इ. इं, द्वितीयावृत्ती), ३, पृ. २५७ इ.
२. रामायण (२, ६८, १८–१९).
३. कॉ. इ. इं., ३, पृ. ६०.
४. डॉ. भांडारकरांनीच प्रस्तावनेत या प्रश्नाची चर्चा करताना ' कर्मजितावनिं गतवतः ' याचा अर्थ ' आपल्या कृत्यांनी (कर्मणा) जिंकलेल्या प्रदेशास गेलेला ' असा केला आहे. पूर्वोक्त. पृ. ६१.
५. चन्द्रगुप्ताची मुख्य राजधानी मगधात पाटलिपुत्र येथे असून दुसरी माळव्यात उज्जैनी येथे होती.
६. उदाहरणार्थ 'सरसीव कीर्तिशेषं गतवति भुवि विक्रमादित्ये ।' हा सुबन्धूच्या 'वासवदत्ते'-तील श्लोकार्ध पाहा.
७. कॉ. इ. इं. ३, पृ. २५९, टीप ७.
८. प्रथम चन्द्रगुप्तानेही असाच वानप्रस्थाश्रम स्वीकारला होता असे डॉ. भांडारकरांनी म्हटले आहे ( पूर्वोक्त, पृ. ८, ६१ इ. ), पण त्यालाही आधार नाही.

अनुक्रमणिका

उत्कटपणे तारुण्य जगलेले

# डॉ. अरुण लिमये

यदुनाथ थत्ते

१९४७ साली सेवादलाचा सर्ववेळ सेवक म्हणून खानदेशात जाऊन दाखल झालो.

काँग्रेस पक्षापासून राष्ट्र सेवादल त्यावेळी स्वायत्त झाले होते आणि कट्टर आणि जवळचे हितसंबंध जपणारी काँग्रेसची मंडळी फार रागावली होती.

एरंडोलचे श्री. सीताराम भाऊ बिर्ला हे अशाचपैकी एक निष्ठावंत काँग्रेस कार्यकर्ते.

एरंडोलच्या सार्वजनिक जीवनाची सर्व सूत्रे आपल्याच हाती असावी असा त्यांना हव्यास होता. विशेषत: आर्थिक सूत्रे त्यांनी आपल्या हाती एकवटली होती. त्यांच्या या असल्या अहिंसक धोरणाला सारे लोक टरकून असत. मनातला असंतोष बोलायचीही लोकांना भीती वाटे.

तसे पाहिले तर 'चले जाव' चळवळीच्या वेळी ही माणसे आमच्या सोबत तुरुंगात होती आणि त्यांच्याशी संबंध प्रेमाचे होते. पण राजकीय विरोधच नव्हे, तर मतभिन्नताही त्यांना मानवत नव्हती !

तत्त्वनिष्ठ विरोधापेक्षा लुच्च्या समर्थकांना जवळ करण्याचे पर्व काँग्रेसमध्ये सुरू होण्याचा तो काळ होता.

एरंडोलच्या त्यांच्या साम्राज्यातही आठदहा पोरे राष्ट्रसेवा दलाच्या भूमिकेला पाठिंबा देणारी होती.

या पोरांच्या पाठीशी उभे होते डॉ. लिमये. शिरूभाऊ व माधवराव लिमयांचे भाऊ. त्यांची मुले सेवादलात येत. सुमन, अरुण ही भावंडे शाळकरी वयाची. राष्ट्र सेवादलाच्या टोळक्यात ती असत आणि सेवादलाबद्दलच्या कळवळ्यामुळे सहजच संपर्कात येत.

एरंडोलला गेलो, की त्यांच्या घरी फेरी होत असे. ही चिमखडी पोरे कोणाचेही लक्ष वेधून घेत असत. त्यानंतर मधली दोन दशके त्यांच्याशी संबंध फार तुटक राहिला. सुमनने सेवादलातलाच एक अन्य जातीचा मुलगा जीवनाचा जोडीदार म्हणून निवडला. लांब चंद्रपूर जिल्ह्यात एक कागद कारखान्यात प्रल्हाद महाजन रसायन-तंत्रज्ञ म्हणून काम करू लागला. शिरूभाऊंच्या बरोबर अधून मधून त्यांच्या संसारात डोकावलो.

अरुणचा संबंध मात्र तुटल्यासारखा झाला. महाविद्यालयात तो विद्यार्थी असताना मी मुंबईत होतो. पुढे 'साधना' पुण्यात आली.

अरुणचे लग्न हीही एक रोमांचकारी रहस्यकथा होती. शिरूभाऊंच्या तोंडून त्यातले किस्से ऐकायला मिळत. शिरूभाऊंशी त्याची विशेष लगट असे. शिरूकाकांचे रोमांचकारी जीवन त्याच्या तरुण मनाला भुरळ घातल्यावाचून कसे राहील ?

अरुण आमच्या परिघाबाहेरच वावरत असे, पण तो आपल्या जवळपास असावा असे फार वाटे. उमदा, आकर्षक व्यक्तिमत्त्वाचा तरुण, आपल्या डॉक्टरी व्यवसायात तरबेज.

एकोणीसशे सत्तरच्या आसपास देशातले वातावरण बदलू लागले. तरुणांच्या बाहूंना स्फुरण चढावे असे वातावरण निर्माण होऊ लागले. नव्याची चाहूल लागू लागली. तरुणांना एकत्र येण्यासाठी एका मंचाची आवश्यकता वाटू लागली.

वैद्यकीय महाविद्यालयातले तरुण आघाडीवर होते. 'साधना' आणि आन्तरभारती ही त्यांना विश्वासाची जागा वाटू लागली. याच तरुणांनी पुढे युवक क्रांती दलाची स्थापना केली. डॉ. कुमार सप्तर्षी, डॉ. अनिल अवचट, डॉ. अरुण लिमये, डॉ. उल्हास लुकतुके आणि आणखी किती तरी.

गुजरातचे नवनिर्माण आंदोलन, बिहारमधला विद्यार्थ्यांचा उठाव, लोकनायक जयप्रकाशांचे नेतृत्व. युवाशक्तीला हे एक आव्हानच होते. बाबा आमटे यांच्या भोवती सोमनाथच्या श्रमसंस्कार छावणीत आठशे-नऊशे तरुण एकत्र होऊन 'हात उगारण्या-

अनुक्रमणिका






साठी नसतात, उभारण्यासाठी असतात' हा घोष घुमवू लागले तो हा काळ.

स्वातंत्र्योत्तर तीस वर्षांत तरुणांना सत्ताधारी पक्षाने फक्त लालूच दाखवण्याचेच काम केले होते. त्यांचे कर्तृत्व देशापुढील विराट आव्हानांशी कधी जोडलेच गेले नव्हते. सामाजिक प्रयोजन विरहित जीवन जगणे त्यांच्या नशिबी आले होते ! त्यामुळे व्यक्तिगत जीवन आनंद पर्यावसायी ठरत असले, तरी सार्वजनिक जीवन मात्र शोकात्म बनत चालले होते.

स्वतःच्या बायकोमुलांत व तत्सम सुखात रमलेला अरुण बेचैन होऊ लागला. घरातली बसलेली घडी उस्कटणार या कल्पनेने त्याची पत्नी व्याकुळ तर देशाची उस्कटलेली घडी नीट बसवण्याच्या चिंतेने अरुण व्याकुळ !

इतके दिवस स्थिरावल्यासारखा वाटणारा अरुण आता भराऱ्या मारू लागला. गावात आणि घरात त्याचा जीव जणू गुदमरू लागला. त्याचे ते अफाट फिरणे व सामाजिक संवेदना सूक्ष्मपणे टिपणे कधी व्याख्यानाच्या तर कधी लेखनाच्या रूपाने प्रवाहित होऊ लागले. त्याच्यात कलेपेक्षा कळकळ अधिक असे आणि तीच हृदयाला स्पर्श करी. लोकनायक जयप्रकाशांनी 'संपूर्ण क्रांति यह नारा है– भावी इतिहास हमारा है' अशी साद घातली आणि तरुण मने अभिमंत्रित झाली.

केवळ राजकारण करणाऱ्या मंडळींनी लोकशाहीदेखील धोक्यात आणली होती. केवळ अर्थकारण करणारी मंडळी आलटून पालटून जनतेलाच वेठीला धरीत होती. समाजपरिवर्तन राजकीय व आर्थिक साफल्यानंतर आपोआप होईल, अशी आपोआपवादी मंडळी आपल्याच शब्दांनी आणि कल्पनांनी वेडावली होती आणि त्यांच्या डोळ्यांदेखत हुंडा, जात यांचा बाजार फोफावत चालला होता. कम्युनिस्टांचे नेतृत्व मानणारे कामगार सार्वजनिक सत्यनारायण घालीत होते आणि समाजवादी म्हणवणारे कामगार अस्पृश्यांना प्रवेश नसणाऱ्या गावच्या मंदिरांचा जीर्णोद्धार करण्यात धन्यता मानीत होते ! सत्ताधारी पक्ष बेगुमान बनला होता. सांस्कृतिक क्षेत्रात आपलीच ठेकेदारी आहे असे मानणारी मंडळी मंत्रांचा कैफ चढवून वास्तवाचे विस्मरण घडवण्यात धन्यता मानीत होती. विपरित वास्तव बदलणे हे संस्कृतीचे मुख्य कार्य आहे याचे त्यांचे भान हरपले होते. अध्यात्मवादी भूत-भविष्याबद्दल चर्पटपंजरी करून वर्तमान जीवनाला मूल्यांची दीक्षा देण्याबाबत हयगय करीत होती.

लोकनायक जयप्रकाश नारायण यांच्यामुळे जाणिवा जागृत आणि प्रखर होऊ लागल्या होत्या. वाचिक प्रबोधनाऐवजी रचना आणि संघर्षाच्या मार्गाने प्रबोधनाची कसोटी लावण्याला तरुणांचे हात शिवशिवू लागले होते. अवघ्या राष्ट्राला हलवून सोडणारे व मुख्यतः तरुणांना चाकोरीबाहेर काढणारे हे स्वातंत्र्योत्तर काळातले पहिलेच आंदोलन होते. पसतिशीच्या उंबरठ्यालगत वावरणाऱ्या अरुणच्या मनातील निखाऱ्यावरील राख फुंकली गेली आणि स्फुल्लिंग धडाकू लागला.

आणीबाणी हा लोकशाही कारभाराबाबत आलेल्या अपयशाचा राज्यकर्त्यांनी दिलेला अप्रत्यक्ष कबुलीजबाबच होता ! जयप्रकाशांची व त्यांना साथ देणाऱ्या हजारो लोकांची धडपकड झाली. अरुणचा त्यात नंबर लागावा हे स्वाभाविकच होते ! अशा कार्यकर्त्यांना तुरुंग ही सुद्धा एक संधीच असते. नाशिकच्या तुरुंगात वैचारिक संघर्ष आणि चकमकी होत होत्या. उष्णता निर्माण होतच असे, पण प्रकाशही मिळत असे. समजूतदारपणे एकत्र येण्याला तयार नसलेल्यांना नियतीने एकत्र आणले होते. चोवीस तास एकत्र राहायचे म्हटले, की मुखवटे उतरवावेच लागतात. अनेकांचे बुरखे आणि मुखवटे जेलमध्ये उतरले आणि अनेकांच्या अंधश्रद्धांना तडे गेले ! तुरुंगात तरुण मंडळींना एक अपूर्व अशी संधी मिळाली. अरुणच्या भोवती तरुणांचा मेळा जमू लागला.

तुरुंगात असतानाच अरुणच्या गळ्यापाशी गाठी झाल्याचे कळले, रक्ताच्या कर्करोगाची डॉक्टरांना शंका आली आणि तपासणीच्या निमित्ताने कैदी अवस्थेतच अरुणला ससूनमध्ये आणले ! अरुणच्या भेटीला गेलो. स्वतःच डॉक्टर असल्याने त्याच्या परिस्थितीची त्याला पूर्ण जाणीव होती. पण त्याचे मन बलदंड होते. आता जे काही दिवस हाती लागतील त्यांतला क्षण न् क्षण उत्कटपणे जगायचा त्याचा निर्धार होता. मृत्यूला बेदरकारपणे तो सांगत

होता, 'तुझी मिजास नको. भयाने तुझ्या पायाशी मी लोटांगण घालणार नाही. एकेक क्षण तुझ्याकडून हिसकावून घेईन आणि तो उजळून टाकीन !' आणि अक्षरशः गेली पाच वर्षे तो असाच जगला. पाच वर्षांतील त्याच्या कामाचा आलेखही विस्मयचकित करणारा आहे. एक दुर्धर रोग घेऊन तो हे सारे करीत होता ! 'कल्पनेहूनी सत्य विलक्षण' असे म्हणतात त्याचा प्रत्यय अरुणकडे पाहून देत होता. 'आनंद' सिनेमाही फिका वाटावा अशा प्रसन्नपणे तो जगत होता !

जनता पक्षाच्या महाराष्ट्र शाखेचे सहसचिवपद त्याने काही दिवस सांभाळले. पण तिथे चालणाऱ्या क्षुद्र राजकारणाचा व जयप्रकाशांच्या संकल्पित संपूर्ण क्रांतीचा संबंधच उरलेला नव्हता. तोंडी लावण्यापुरतीच संपूर्ण क्रांती अनेकांना हवी होती. त्या क्रांतीच्या कल्पनांनी जीवने उजळण्याऐवजी क्रांतीच काळवंडून चालली होती ! अरुणने ते सहसचिवपद सोडले आणि लोकशक्ती निर्माण करण्याची साधने तो शोधू लागला. हुंडाप्रतिबंधक चळवळ, मराठवाडा विद्यापीठ नामांतर चळवळ, विषमता निर्मूलनाची चळवळ, देवदासी व तलाकपीडितांच्या परिषदा, गुजरातमधील आरक्षण विरोधी चळवळ, बुवाबाजी, अंधश्रद्धा यांच्या उच्चाटनाचे प्रयत्न ह्या सर्वांत अरुण आघाडीवर असे. कर्करोगाचा तो रुग्ण आहे हेही लोकांनी विसरून जावे अशा प्रकारे त्याचे कर्तृत्व सर्वांगी फुलत होते. याच काळात त्याने कायद्याची पदवीही लीलया संपादन केली.

अत्याधुनिक उपचाराचा लाभ मिळावा म्हणून त्याने अमेरिकेत जायचे ठरविले, तेव्हा या आपल्या उमद्या सहकाऱ्यासाठी लाख रुपये पाहता पाहता जमले. अमेरिकेतील उपचारांमुळे जीवनाची दोरी लांबली. परतल्यावर महिन्याकाठी आठदहा दिवस उपचारांचा आजार भोगण्यात खर्ची पडत आणि उरलेले वीस दिवस अनंत कामांचा उरका पाडीत कापरासारखे उडून जात !

तथाकथित शिकल्यासवरल्या व प्रतिष्ठित समाजाला लौकिक यशाच्या क्लोरोफॉर्मची भूल पडते व त्यांच्या संवेदनाच नाहीशा होतात. वैद्यकीय व्यवसायाचे अरुणने जवळून दर्शन घेतले होते. रोग्याने मदतीसाठी दिलेली हाक ही त्याला नागवण्याची एक सुवर्ण संधी असते असे मानणारे कसाब हृदयं डॉक्टरांच्या पांढऱ्या ॲप्रनखाली दडलेले असते, हे विदारकपणे अरुणच्या 'क्लोरोफॉर्म' पुस्तकाने पुढे मांडले ! सांप्रदायिक डॉक्टरांनी, व्यवसायाची त्याने बदनामी केली अशी हाकाटी केली, पण अनेकांनी त्यातील सत्यतेची मनोमनी कबुलीही दिली. संप्रदाय मग ते जातिधर्मांचे असोत की व्यवसायांचे, ते पापांवर पांघरुण घालण्यासाठीच असतात, विपरित घटनेबद्दल ते मौन पाळतात आणि त्याचा कोणी बभ्रा केला की ते आरडाओरडा करतात ! अरुणने या हाकाटीची फारशी फिकीर केली नाही.

त्याने या काळात केलेला अत्यंत मोलाचा उद्योग म्हणजे आणीबाणीच्या काळातील अस्सल कागदपत्रांचा त्याने केलेला संग्रह. एखाद्या तळमळीच्या इतिहाससंशोधकाप्रमाणे एकेका अस्सल कागदासाठी तो वणवणला ! हा इतिहास देशातल्या शासकांनी आकसाने पुसायचे ठरवले तरीही ती अस्सल कागदपत्रे त्याने परदेशात जतन होतील अशी चोख व्यवस्था आधी करून ठेवली आणि खंडशः ही कागदपत्रे संपादित व प्रकाशित करण्याची महत्त्वाकांक्षी योजना हाती घेतली. दंडवते दांपत्याच्या आपातकालीन पत्रव्यवहाराचा पहिला खंड प्रकाशनाच्या मार्गी त्याने लावून दिला.

सामाजिक कृतज्ञतेने ओथंबलेले आपले जीवन त्याने 'लाख मोलाचा जीव' मध्ये शब्दांकित करून ठेवले आहे. त्याचे प्रकाशन होईल तेव्हा मराठी साहित्याचे दालन त्याने अपूर्व रीतीने संपन्न केले असा निर्वाळा द्यावा लागेल.

अरुणच्या हे ध्यानात आले होते की निबर झालेली मने बदलण्याच्या कामी खर्च होणाऱ्या शक्तीच्या मानाने त्यातून होणारी निष्पत्ती अल्प असते. याउलट मने निबर होण्यापूर्वीच त्यांना योग्य दिशा देता आली तर ते उचित ठरेल. अरुणने मग एक दिवस सांगितले, की आता सेवादलाच्या कामावरच मी लक्ष केंद्रित करण्याचे ठरवले आहे ! अरुणसारख्या प्रसन्न, समंजस, तळमळीच्या तरुणाचे नेतृत्व सेवादलाला लाभले तर कामाच्या वाढीला ते पोषक ठरेल असे मला वाटले. अरुणच्या व्यक्तित्वात एक संतुलन साधले होते. रचना किंवा संघर्ष अशी

एकांतिक भूमिका त्याची नव्हती. रचनेतून इसार दिल्यावाचून खराखुरा संघटित संघर्ष उभाच राहू शकत नाही. आणि नवरचनेत हितसंबंधीयांचे अडथळे आले, की संघर्ष अटळ होत असतो. पण सेवादलाची भूमिका ही मूलतः शैक्षणिक असल्याने रचना आणि संघर्ष यांचाही विचार शैक्षणिक संदर्भातच करणे अपरिहार्य आहे. सेवादलातल्या कुरबुरींना आवर घालण्याला त्याचे व्यक्तिमत्त्व उपयोगी होते. पण एका अर्थाने सेवादलाच्या दैनंदिन कामात तो नवीनच होता. त्याने अध्यक्ष व्हावे अशी माझी इच्छाच नव्हे तर खटपटही होती, पण अरुणने सेवादलाचे सहसचिवपद पत्करले आणि जोमाने कामाला सुरवात केली.

सेवादलाच्या दैनंदिन रहाटात सेवादलाने स्वीकारलेल्या मूल्यांचे विस्मरण होता कामा नये, असा त्याचा प्रयत्न होता. अंधश्रद्धा, जातीयता, बुवाबाजी, दैवी शक्ती यांमुळे सामान्य माणसाची नागवणूक होते आणि त्याचा पुरुषार्थ खच्ची होतो आणि, हे थांबवायचे तर वैज्ञानिक दृष्टीचा प्रचार केला पाहिजे. त्याला हा ध्यासच लागला होता. केरळमधील लोकविज्ञान चळवळीच्या धर्तीवर आपल्याकडेही काम चालू व्हावे म्हणून त्याने काही कार्यक्रम आयोजित केले होते आणि ते गाजलेही. चमत्कारांमागील शास्त्रीय कारणे लोकांना प्रयोगांनी स्पष्ट करण्याचा हा प्रयत्न चांगलाच यशस्वी झाला. त्या कार्यक्रमांसाठी लागणारी पैशांची जुळवाजुळवही करता येईल, असा त्याला विश्वास वाटत होता.

संघटना करायची तर त्यात दोन गोष्टींचा मोठा अडथळा येतो : आळस आणि अहंता । अरुणच्या बाबतीत ह्या अडथळयांची शक्यताच नव्हती. त्याची प्रसन्नता आणि तत्परता यामुळे त्याच्या भोवती तरुणांचा सदैव गोतावळा जमलेलाच असे. दलित-वंचित-दुबळे यांचा त्याला विशेष उमाळा होता आणि विश्वासाने ही मंडळी त्याच्याकडे येत असत. योजकतेचा दुर्मिळ गुण त्याच्याजवळ होता त्यामुळे ‘ साहे ओझे त्यास तेच देऊन ’ तो त्यांना कामाला जुंपू शके.

त्याचा अंत इतक्या जवळ आला असेल अशी कोणाला शंका देखील नव्हती, अशा झोकात त्याचे काम सुरू होते. पण त्याला अचानक हर्पिझ म्हणजे नागीण हा रोग झाला. कर्क रोगाची आणि नागीणीची युती झाली की ते यमाचे बोलावणेच समजले जाते ! अरुणने तोवर ज्या धीरोदात्तपणे रोगाचा मुकाबला केला होता त्याच्यावर यातना मात करू लागल्या. त्याच्या शरीराची होणारी आग असह्य होती. त्याचे ते कळवळून ओरडणे ऐकले, की हृदय ठाव सोडून देई. भरीला निमोनिया आला. अरुणची सारी प्रसन्नता कोमेजून गेली. येणाराशी चारदोन वाक्ये तो बोलायचा आणि मध्येच कळवळून ओरडायचा आणि मग थकून निपचित पडून रहायचा ! सर्वांच्याच तोंडचे पाणी पळाले. धीरगंभीर शिरूभाऊ लिमये यांनाही खिन्नतेने येऊन घेरले. मृत्यूदेखील मित्र वाटावा अशा या यातना होत्या !

वयाची पन्नाशी गाठण्यापूर्वीच एक उमलते गेंदेदार, सुगंधी फूल नियतीने खुडले ! अखेरच्या एका दशकात अरुण इतक्या उत्कटतेने दर क्षण जगला, की आधीच्या तीस वर्षांची बेरीजही त्यापुढे फिकी वाटावी !

---

### वीरप्पाचे वीरभद्रात रूपांतर

कुरुब-धनगरांचा ख्यातनाम देव जो बिरोबा अथवा बीरप्पा, त्याचे अनेक ठिकाणी वीरभद्रात रूपांतर घडले असल्याची नोंद गोपजन-संस्कृतीचे गाढे अभ्यासक डॉ. गुंथर डी. सोंथायमर यांनी पुराव्या-निशी केली आहे.[१८] 'बीरप्पा अथवा बिरोबा हा केवळ कुरुब-धनगरांचा देव आहे आणि काही पारंपरिक कथा-गाथांनुसार तो वीरभद्र मानला गेला आहे,' अशी एके ठिकाणी नोंद करून, अन्यत्र ते म्हणतात की, 'लिंगायत सांप्रदायिकांत लोकप्रिय बनलेल्या वीरभद्राशी बिरोबा एकरूप मानला गेला आहे. शिवगणांचा नेता आणि दक्षयज्ञाचा विध्वंसक म्हणून पुराणप्रसिद्ध असलेला वीरभद्र कर्नाटकातील स्थिरजीवी कुरुबांचा कुळस्वामी आहे. महाराष्ट्रातील नगर जिल्ह्यातल्या काही खेड्यांत बिरोबा हा वीर-भद्र म्हणून पूजिला जातो. उदाहरणार्थ, पुणतांबे तालुक्यातील धोत्रे या गावी बिरोबाला वीरभद्र म्हणून प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे.' स्थिरजीवी धनगर अथवा कुरुब यांच्यावर लिंगायत संप्रदायाचा प्रभाव आहे आणि या प्रभावामुळे बिरोबाचे वीरभद्रात रूपांतर घडण्याला अवकाश मिळाला आहे, अशी डॉ. सोंथायमर यांची मीमांसा आहे. त्यांनी 'हालुमतचरित्र' या गोपजनविषयक कन्नड पुस्तकाच्या आधारे बिरोबा-वीरभद्र-ऐकात्म्याची एक कथाही विस्ताराने दिली आहे. या कथेनुसार वीरभद्र हा ब्रह्मदेवाची पत्नी सरस्वती हिच्या उदरी वीरेश्वर अथवा वीरलिंग या रूपाने जन्मला आहे आणि तोच धनगर-कुरुबांचा आदिदेव अथवा कुळदेव बनला आहे. म्हणजे बिरोबा हा धनगर-कुरुबांसाठी वीरभद्राने घेतलेला अवतार आहे, अशी लिंगायत वातावरणात त्यांची श्रद्धा दृढ केली गेली आहे. वीरभद्राने घेतलेल्या वीरेश्वर अवताराची कथा अशी आहे :

ब्रह्मदेवाच्या वराने मातलेल्या हिरण्यकशिपूने त्रैलोक्याला संत्रस्त केल्यावर सर्व देव महाविष्णूकडे गेले. त्याने देवांच्या विनवणीला मान देऊन नृसिंहावतार धारण केला आणि हिरण्यकशिपूला मारले. परंतु नृसिंहाचे भयानक रूप लोकांना सहन होईना. म्हणून ब्रह्मदेवाच्या नेतृत्वाने सर्व देवांनी शंकराकडे जाऊन त्याचा सल्ला विचारला. शंकराने गणांसह वीरभद्राला नरसिंहाला शांत करण्यासाठी अथवा तो शांत न झाल्यास त्याला ठार करण्यासाठी पाठविले. वीरभद्राने शिवाच्या आदेशानुसार नरसिंहाचे मस्तक उडविले आणि ते शिवाकडे आणून दिले. शिवाने ते अभिमानाने आपल्या कंठात बांधले. ही घटना कळताच विष्णूला वीरभद्राच्या कृत्याचा राग आला.

पुढे शिवपार्वती कैलासावर बसलेली असताना वीरभद्राने त्यांच्याजवळ अशी इच्छा व्यक्त केली की, मला पृथ्वीवर जावेसे वाटते. त्यांनी त्याला इच्छापूर्तीचा वर दिला. त्या वरानुसार वीरभद्राने सरस्वतीच्या उदरी जन्म घेतला. वीरभद्राच्या या नव्या जन्माचे वृत्त समजताच, सूडाने पेटलेला महाविष्णू वृद्ध ब्राह्मणाच्या रूपाने सरस्वतीकडे गेला आणि 'हे मूल अपशकुनी असल्यामुळे याचे तोंडही न पाहता याला स्मशानात सोडावे,' असा त्याने तिला सल्ला दिला. तिने तसे केलेही ! स्मशानात टाकलेल्या त्या परित्यक्त बालकाविषयी वनदेवतांना आणि जल, वायू, भूमी इत्यादी देवतांना अनुकंपा वाटली. मायम्मा नावाच्या एका स्त्रीने स्मशानातून त्या मुलाला उचलून नेले आणि वीरलिंग या नावाने वाढविले. या नंतर काही काळाने कोनासुर नामक कारयणगोत्री दैत्याने सातशे कुरुबांची छळणूक केली. ते वीरलिंगाकडे आले आणि 'कोनासुरापासून आपल्याला वाचवावे,' म्हणून त्यांनी वीरलिंगाची प्रार्थना केली. वीरलिंगाने कोनासुराला कोनूर येथे ठार मारले. वीरलिंगाच्या या कार्यामुळे कुरुब त्याचे

---










पूजक बनले आणि ते त्याला आपला आदिदेव अथवा कुळदेव मानू लागले.

विरोबा / बीरप्पा / वीरेश्वर / वीरलिंग हा कुरुब-धनगरांचा देव वीरभद्रात रूपांतर पावला तो लिंगायत प्रभावाच्या वातावरणात, ही डॉ. सोंथायमर यांनी पुरवलेली माहिती महत्त्वपूर्ण आहे. आंध्र-कर्नाटक-महाराष्ट्रातील लिंगायत / वीरशैव समाजात शिव आणि नंदी यांच्याबरोबरच वीरभद्राचे महत्त्व फार आहे. भारतात शैव वातावरणात अन्यत्र कुठेही एवढ्या मोठ्या प्रमाणात वीरभद्राची उपासना रूढ नाही. कर्नाटकात तर वीरभद्राची मंदिरे कितीतरी गावांत आणि वीरशैव मठांत आजही भक्तांच्या वर्दळीने गजबजलेली आहेत. वीरभद्राचा महिमा या विवक्षित प्रदेशातील शैव धर्मातच का वाढावा, हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. या प्रश्नाचे उत्तर आपणांस या प्रदेशांतल्या विशिष्ट सामाजिक स्थितीतून मिळू शकते. गवळी–गोल्ल–कुरुब–धनगर हे गोपजन दक्षिण भारतातील या विवक्षित प्रदेशात अतिप्राचीन काळापासून संचार करताहेत/राहताहेत. वीरशैव धर्माच्या प्रभावकाळात जेव्हा हे गोपजन-समाज सामूहिक रीत्या वीरशैव बनले, तेव्हा त्यांच्या मूळच्या अत्याधिक लोकप्रिय देवाला त्यांच्या नव-स्वीकृत श्रद्धाविश्वात उंचावून घेण्याची आणि प्रतिष्ठित करण्याची गरजच होती. बिरीपा / बीरप्पा या नावातील 'बीर' हे पद ध्वनिसाम्यामुळे प्रतिष्ठित शैव धर्मातील वीरभद्राचे सहजच स्मरण घडविणारे आहे. शिवाय उग्र प्रकृतीच्या दृष्टीनेही बीरप्पा आणि वीरभद्र यांचे साम्य आहे. नावांतील उच्चारसाम्य आणि उग्र प्रकृतीचे साम्य बीरप्पाचे वीरभद्रीकरण घडविण्यास अत्यंत सोयीचे ठरले आणि वीरशैवांनी या नवागत गोपजनांच्या पूर्व-श्रद्धांना उंचावून घेण्यासाठी आणि त्यांच्या पूर्व-श्रद्धांचे संतर्पण घडविण्यासाठी बीरप्पाचे त्याच्या अनेक ठाण्यांत वीरभद्रीकरण घडविले. आंध्र–कर्नाटक–महाराष्ट्रातील वीरशैवांच्या प्रभावक्षेत्रात वीरभद्रोपासनेला जे विशेष महत्त्व प्राप्त झाले, त्याची सामाजिक पार्श्वभूमी ही अशी आहे.

नवागतांच्या पूर्वश्रद्धांची व्यवस्था लावण्याची ही अशी प्रक्रिया भारतीय परंपरेत अनेक धर्मसंप्रदायांत घडलेली दिसून येते. उदाहरणार्थ, जैन धर्मातील दैवतमंडळात यक्ष-यक्षिणींचा जो प्रचंड संभार आहे, तो याच प्रक्रियेचा जबरदस्त पुरावा आहे. जैन धर्माच्या प्रभावाच्या पहिल्या पर्वातच वणिग्जनांनी /व्यापारी समूहांनी त्याचे अनुयायित्व फार मोठ्या प्रमाणात स्वीकारले, असे जैनांच्या प्राचीन आगम ग्रंथांतील अनेक कथांतून दिसून येते. यक्षश्रेणीतले देव हे प्राधान्याने वणिग्जनांचे देव होते. धनदायक आणि निधिरक्षक देव म्हणून त्यांची उपासना धन-साधक वर्गात लोकप्रिय झालेली होती. हे वर्ग जेव्हा जैन धर्मात प्रविष्ट झाले, तेव्हा त्यांचे श्रद्धाविषय बनलेले हे मूळचे देव त्याज्य मानणे जैन धर्माच्या धुरीणांना सोयीचे नव्हते. या नवदीक्षितांच्या पूर्व-श्रद्धांना गोंजारून, गौणत्वाने का होईना, परंतु त्यांच्या पूर्व उपास्यांची आपल्या दैवतमंडळात सोय लावून त्यांना जैन धर्मात रुजवणे हे धर्मधुरीणांना साधायचे होते. म्हणून त्यांनी वणिग्जनांच्या पूर्व-श्रद्धांतील यक्ष-यक्षिणींना तीर्थंकरांचे परिचर म्हणून स्थान दिले. वीरशैव धर्मातील वीरभद्राच्या महिम्याचे रहस्यही याच प्रकारचे आहे.

## यडूरचा वीरभद्र : मूळचा वीरप्पाच

बीरप्पाचे वीरभद्रीकरण वीरशैवांच्या प्रभाव-क्षेत्रात कसे घडले असेल / कसे घडत असेल, याचे उत्कृष्ट उदाहरण कर्नाटकातील यडूर या गावाच्या क्षेत्रप्रतिष्ठेतून मिळू शकते. यडूर हे गाव कर्नाटकात बेळगाव जिल्ह्याच्या चिकोडी तालुक्यात आहे. कृष्णेच्या डाव्या तीरावर वसलेले हे लहानसे गाव उत्तर कर्नाटकातील लिंगायतांचे एक मोठे क्षेत्र मानले जाते. येथे वीरशैवांचा काडदेवरु मठ असून, त्या मठाचे पट्टचरमूर्ती स्वामी हेच यडूर येथील वीरभद्र मंदिराचे हक्कदार पुजारी आहेत. या गावाचे 'क्षेत्र यडूर' आणि 'गाव यडूर' असे एक मैल अंतरावर असलेले दोन भाग आहेत. क्षेत्र यडूर येथे वीरभद्राचे अत्यंत प्रशस्त असे मंदिर असून, मंदिराच्या परिसरात प्राधान्याने जंगम-भिक्षुकांचीच वस्ती आहे. येथील काडदेवरू मठाचे आदिपीठ कोल्हापूरजवळच्या सिद्धगिरीवर कणेरी गावात आहे आणि त्याची एक शाखा पूर्वोक्त कोनूर या गावी आहे. पेशवाईत ब्राह्मणवर्चस्वाच्या काळात या भागाची सत्ता जेव्हा ब्राह्मण सत्ताधीशांकडे काही काळ गेली, त्यावेळी वीरभद्राच्या पूजेअर्चेचे अधिकार

अनुक्रमणिका

लिंगायतांकडून ब्राह्मणांकडे सत्ताबळामुळे गेल्याची नोंद लिंगायत परंपरेतील जाणकारांनी तपशीलवार करून ठेवली आहे.[१९] वीरभद्राच्या पूजाधिकारासंबंधीचा ब्राह्मण–लिंगायत संघर्ष दीर्घकाळपर्यंत चालू राहिला आणि अखेरीस लिंगायतांनी आपले पूर्वाधिकार प्राप्त करण्यात यश मिळविले.

एखाद्या प्रचंड गढीसारख्या तटबंदीने युक्त अशा प्राकारात वीरभद्राचे भव्य मंदिर (१५०'×१००') आहे. विशेष म्हणजे "...या सर्व शोभादायक गोष्टींत सृष्टिदेवीनेही या ठिकाणी चिंचेच्या झाडांचे विशाल बन उत्पन्न करून त्यात आपल्या निसर्गसौंदर्याची विलक्षण भर घातली आहे. या बनात शेकडो वर्षे आपल्या शीतल छायेने व नयनमनोहर देखाव्याने हजारो यात्रेकरूंची अंतःकरणे आकर्षून घेणारे अनेक गगनचुंबी वृक्ष आहेत. इतकी उंच व विशाल चिंचेची झाडे या भागात नदीच्या काठी आणखी कोठेही नाहीत... अशा तऱ्हेने रमणीय बन व त्यातील सुंदर व पवित्र असे वीरभद्र देवाचे देवालय... यांमुळे या पवित्र क्षेत्रास फारच शोभा आलेली आहे."[२०] अशा शब्दांत भाविकांनी या स्थानाच्या वैशिष्टयाविषयीच्या आपल्या भावना व्यक्त केल्या आहेत.

येथील वीरभद्राच्या मंदिरात मुख्य पूजाविषय असलेला वीरभद्र हा मूर्तिरूपात नसून, शाळुंकायुक्त शिवलिंगाच्या रूपात आहे. उत्सवासाठी (पालखीतून मिरवीत नेण्यासाठी) वीरभद्राचे जे चलरूप आहे, ते मात्र पंचरसी धातूच्या सांग-सायुध मूर्तीचे आहे. खड्ग, त्रिशूल, धनुष्यबाण आणि पट्टीश या आयुधांनी युक्त अशी, सात-आठ इंच उंचीची ही वीरभद्राची चतुर्भुज उत्सवमूर्ती एका पितळी प्रभावळीच्या मध्यभागी बसविलेली आहे. याच प्रभावळीत डावीकडे भद्रकाळीची आणि उजवीकडे दक्षप्रजापतीची मूर्ती बसविलेली आहे, मध्यभागी वीरभद्राच्या मूर्तीच्या पायांशी पादुका असून, त्यांच्या दोन्हीकडे दोन लहान सुबक नंदी आहेत.

या वर्णनावरून हे स्पष्ट होईल की, या मंदिरातील वीरभद्राचा मूलविग्रह मूर्तिरूप नसून लिंगरूप आहे. पाच शतकांपूर्वीपासून गाजत असलेल्या या वीरभद्रक्षेत्रातील वीरभद्रलिंगाची 'पुनःस्थापना' आद्य काडदेवरु नामक वीरशैव सिद्धपुरुषाने केली, असे येथील परंपरा सांगते. 'पुनःस्थापना केली' असे म्हणण्याचे कारण असे की, वीरशैवांच्या श्रद्धेनुसार दक्षयज्ञविध्वंसाची घटना याच ठिकाणी घडली होती; त्या दैवी विक्रमानंतर वीरभद्र देव येथेच विसावला होता; परंतु पुढे कलियुगात ते पुराणप्रसिद्ध असे वीरभद्रलिंग लोकांच्या उपेक्षेमुळे भूगर्भात गाडले गेले आणि या परिसरात राहणाऱ्या 'अज्ञ' धनगर–गवळ्यांनी आपल्या क्षीण स्मृतीला आणि जातीय श्रद्धेला अनुसरून त्याच वीरभद्र–स्थानावर आपल्या 'बीरदेवा'ची स्थापना केली !

आद्य काडदेवरु सिद्धांनी वीरभद्रलिंगाची स्थापना, नव्हे– 'पुनःस्थापना' करण्यापूर्वी य स्थानींची परिस्थिती कशी होती, याचे वीरशैव दृष्टीतून केलेले वर्णन पाहण्यासारखे आहे: "या काळी श्रीवीरभद्रलिंगाची विशेष प्रसिद्धी नसून, येथील पूर्वकाळचे विशाल यज्ञकुंड चोहो बाजूंची माती आत पडून बुजून जाऊन त्यात गवत व झुडपे वाढली होती. अर्थात् श्रीवीरभद्रलिंगही जमिनीत बुजून जाऊन नामशेष झाले होते. आणि त्यावरच यज्ञकुंडामध्ये या अरण्यात गुरे व मेंढरे चरण्यास सोडणाऱ्या धनगरांनी व गुराख्यांनी आपल्या 'बीर' (बीराप्पा) नावाच्या देवाची स्थापना केली होती, व त्याचे एक लहानसे देऊळही बांधिले होते. श्री वीरभद्रदेवाचे, जवळ अथवा दूरच्या प्रदेशात राहणारे कित्येक निःसीम भक्त या क्षेत्रात देवदर्शनाला येत, तेव्हा या बीरासच 'वीर' (श्रीवीरभद्रदेव) समजून त्याचीच पूजा-अर्चा अगर गुग्गुळ, अग्नी वगैरे प्रकारांनी आराधना करून संतुष्ट होऊन परत जात. खुद्द श्रीवीरभद्रलिंगाची जर ही स्थिती, तर नंदी, रुद्रपाद वगैरे देवांचा पाड काय ? सर्वच देवांवर जंगल वाढून त्यांचा मागमूस देखील राहिला नव्हता."[२१]

यडूर येथे अशी परिस्थिती असताना सिद्धगिरीचे आद्य काडदेवरु अथवा काडसिद्धेश्वर स्वामी हे यात्रा करीत करीत या ठिकाणी आले. त्यांना हे स्थान आवडले. त्यांनी बीरदेवमंदिराच्या उत्तरेकडे जवळच अरण्यात एक पर्णकुटी बांधून येथेच रहायचे ठरविले. येथे रहायला प्रारंभ करताच 'त्यांना आपल्या अवतारकार्याची पूर्वस्मृती होऊन स्फूर्ती झाली की, येथील श्रीवीरभद्रलिंगाचा व या क्षेत्राचा आपण जीर्णोद्धार करावा.' आपल्याला झालेला दैवी दृष्टान्त त्यांनी आसपासच्या लोकांना सांगितला.

अनुक्रमणिका

मातीने आणि पालापाचोळ्याने भरून गेलेला बीरदेव मंदिराचा खोलगट बांधीव प्राकार हेच दक्षप्रजापतीचे पुरातन विशाल यज्ञकुंड आहे, असे प्रकट करून त्यांनी ते लोकांकडून साफ करविले. नंतर त्याच्या मध्यभागी असलेले लहानसे बीरदेवमंदिर पाडून टाकण्याचा त्यांनी लोकांना आदेश दिला. लोक श्रद्धेमुळे संकोचत आहेत असे, पाहिल्यावर स्वतः कुदळ घेऊन ते पुढे सरसावले आणि पाहता पाहता ते मंदिर जमीनदोस्त झाले. त्यानंतर त्यांनी स्वहस्ते बीरदेवाची पिंडी बाजूला उचलून ठेवली आणि त्या पिंडाच्या जागी खोल खणायला सांगितले. त्या ठिकाणी केलेल्या उत्खननात हातभर उंचीची जी पिंडीवजा शिळा आढळली, तीच पुरातन वीरभद्राची लिंगशिळा आहे, असे त्यांनी आपल्या पारमार्थिक अधिकाराने लोकांना सांगितले. त्यांनी 'यावेळी या वीरभद्र देवाच्याच नावाने यापूर्वी अनेक वर्षे पूजोपचार ग्रहण करणाऱ्या बीरदेवाचीही तेथे जवळच उजवीकडे स्थापना केली.'

यानंतर काडसिद्धेश्वरांच्या प्रभावामुळे सामान्य भक्तजन आणि राजपुरुषही या स्थानाकडे आकृष्ट झाले. भव्य मंदिर उभे राहिले; उत्खननात आढळलेल्या 'स्वयंभू' पिंडीच्या वरच्या भागी नवीन वीरभद्रलिंगाची स्थापना झाली; मठस्थापना झाली; परिवारदेवतांचा संभार निर्माण झाला; इनामेवर्षासने दिली गेली; उत्सव-महोत्सव आणि नित्य-नैमित्तिक उपासना यांचे स्वरूप निश्चित झाले. एकूण श्रीक्षेत्र यडूर हे वीरभद्राचे गाजते ठाणे बनले !

यडूर येथे आद्य काडदेवरु यांनी घडविलेले हे धार्मिक स्थित्यंतर प्रतिष्ठित करण्याची प्रक्रिया सातत्याने चालूच राहिली. दोन-अडीचशे वर्षांपूर्वी 'चित्रकूट' (चिकोडी) गावच्या कोणा मोरेश्वर-नामक ब्राह्मण विद्वानाने 'श्रीवीरभद्रदेवचरित्र' या नावाचे बावन्न अध्यायांचे बृहत् स्थलपुराण रचून, इथल्या स्थानिक मौखिक परंपरांचे संस्कृतीकरण करण्याचा मोठा प्रयत्न केला. काडदेवरु मठाची मोडीत लिहिलेली जी मराठी बखर आहे, तिच्यातही याच पद्धतीने या धार्मिक स्थित्यंतराची मांडणी केलेली आहे. या दोन साधनांच्या आधारे आणि प्रत्यक्ष निरीक्षण करून यडूर क्षेत्राचा इतिहास पारंपरिक दृष्टिकोनातून मांडणाऱ्या लेखकाने या स्थित्यंतराचा उल्लेख पुनः पुनः केलेला आहे. हा लेखक म्हणतो :[२२] "श्रीकाडदेवरु स्वामी येथे येण्यापूर्वी या क्षेत्रातील मुख्य स्थान म्हणजे एक विशाल यज्ञकुंड व त्यात बांधिलेले एक लहानसे ओबडधोबड देऊळ आणि त्यात एक बीरदेवाची मूर्ती (पिंडी ? ) इतके होते. यडूर गावातील कित्येक लोक मोठमोठ्या सणावारांच्या दिवशी दर्शनास जाऊन श्रीवीरभद्रदेवास म्हणजे खरोखर त्यावेळच्या बीरदेवासच नैवेद्य वगैरे दाखवून परत निघून येत. अशा देवाला त्यावेळी पुजारी कोठला ? व नित्याची पूजा तरी कोठली ? फक्त धनगर व गुराखी येथे दिवसा मेंढरे व गुरेढोरे चारण्यास घेऊन येत व संध्याकाळच्या आत परत घेऊन जात."

श्रीकाडदेवरु मठाच्या बखरीत 'श्रीस्वामींनी आपले महत्त्व दाखवून बीरदेवास पलीकडे सारून दक्षयज्ञकुंडात उत्तम रीतीने वीरभद्रलिंगाची स्थापना केली,' असे वर्णन आले आहे. बखरीची भाषा कन्नड-प्रभावित भ्रष्ट मराठी आहे. बखरीतील मूळचे शब्द असे आहेत : "हडूर (यडूर) येथे बीरापानी दक्षाच्या यागकुंडात होता. बीरापास येकीकडे करून स्वामीनी आपले महत्त्व दाखवून श्रीवीरभद्रस्थापना केली."[२३]

यडूर क्षेत्राच्या उत्थानाची अथवा अभ्युदयाची ही वीरशैवीय कहाणी आपण ताटस्थ्याने ऐकल्या-बरोबर या ठिकाणी घडलेल्या धार्मिक स्थित्यंतराचे सत्य स्वरूप तत्काळ ध्यानी येते :

(१) हे मूळचे गवळी-धनगरांच्या बीरदेवाचे अथवा बीरप्पाचे ठाणे होते.

(२) त्या ठाण्यातील मूळचे उपासक तेच होते आणि त्यांच्या रीतीप्रमाणेच ते आपल्या देवाची उपासना करीत होते.

(३) आद्य काडदेवरु स्वामींच्या नेतृत्वाने आणि त्यांचा पारमार्थिक अधिकार वापरून वीरशैवांनी या बीरप्पाच्या ठाण्याचे रूपांतर वीरभद्रक्षेत्रात केले.

(४) अर्थातच पूर्व उपासकांचा वर्ग या परिवर्तनाचा स्वीकार करण्याच्या मन:स्थितीत यायचा असेल, तर त्या वर्गाचे वीरशैवीकरण घडणे अटळच होते.

(५) वीरदेव अथवा बीरप्पा या मूळ नावातील 'बीर/वीर' या पदाच्या सोयीने त्याचे वीरभद्रात रूपांतर करणे सहज शक्य झाले.

(६) वीरप्पाचे वीरभद्रीकरण झाले, तरी त्याच्या मूळ रूपाचे उच्चाटण करणे परिवर्तकांच्या दृष्टीनेही गैर ठरणारे होते; म्हणून त्यांनी त्याला वीरभद्राच्या उजवीकडे एका देवळीत 'जागा' दिली.

(७) बीरप्पाच्या यात्रेचा मुख्य दिवस चैत्री पौर्णिमेचा होता, तो नव्या उपासनासंभारातही तसाच राखला गेला. वीरभद्रलिंगस्थापनेचा सोहळा चैत्री पौर्णिमेस झाला असला पाहिजे, असे त्या यात्रेचे प्रयोजनही स्पष्ट करण्याची प्रथा पडली.

(८) वीरप्पाच्या यात्रेत धनगर भगतांचे जे 'हुईका'चे (भविष्यकथनाचे) अथवा भाकणुकीचे प्रकार चालू होते, ते नव्या उपासनासंभारात बंद केले गेले, तरी त्यांचा 'उन्नत' पर्याय रूढ करणे परिवर्तकांना अपरिहार्य ठरले. आजही वीरभद्राच्या अनेक उत्सवांत आणि नैमित्तिक उपासनेत पालखीच्या मिरवणुकीच्या वेळी आद्य काडदेवरु यांनी रचलेली कन्नड 'भविष्यवचनांची गीते' न चुकता गायली जातात. ही गीते म्हणजे 'हुईका'चा उन्नत पर्याय होय, असे मानल्यावाचून वीरभद्राच्या उपासनेतील त्यांचे प्रयोजन स्पष्टच होऊ शकत नाही.[२४]

(९) वीरभद्राची आजची उत्सवमूर्ती लक्षणांना अनुसरून सांग-सायुध अशी असली, तरी ती अलीकडची आहे. तीनएकशे वर्षांपूर्वीपर्यंत जी उत्सवमूर्ती वापरात होती, ती आजही सुरक्षित असून, तिला 'मुद मल्लाप्पा' (वृद्ध मल्लाप्पा) असे नाव आहे. मल्लिकार्जुन / मल्लण्णा / मल्लाप्पा / मैलार हे गोपजनांच्या देवाचे नामपर्याय प्रसिद्ध आहेत.

१०) वीरभद्राचे मंदिर आजही ज्या वनात आहे, ते वन महाकाय अशा चिंचेच्या वृक्षांचे आहे ही वस्तुस्थितीही बीरप्पाच्या उपासनेतील चिंचापावित्र्याकडे सरळ संकेत करणारी आहे; यात मुळीच संशय नाही. हे चिंचेच्या झाडांचे बन या भागात वैशिष्टचपूर्ण असल्याची कबुली वीरभद्रोपासक लिंगायतही देतात.

११) वीरभद्राच्या यात्रेत गुरांचा बाजार भरतो. गुरांच्या बाजाराचे हे वैशिष्टचही सध्याच्या वीरभद्राच्या 'मूळ प्रकृती'चे सूचन घडविणारे आहे.

१२) वीरप्पाची पोषणकर्त्री भगिनी मायाक्का हिचे चिंचली क्षेत्र आणि बीरप्पाने कोनासुराचा वध केल्यामुळे ज्या स्थानाला 'कोनूर' हे नाव पडले ते कोनूर क्षेत्र ही धनगरांची दोन प्रख्यात क्षेत्रस्थाने यडूरपासून दूर नाहीत. कोनूर येथे तर काडदेवरु मठाची शाखाच स्थापन झालेली आहे.

यडूर क्षेत्राच्या धार्मिक वैशिष्टचांचे हे विश्लेषण वीरप्पाच्या वीरभद्रीकरणाची लुप्त कहाणी पुन: मुखरित करणारे आहे, हे आता आपल्या सहजी प्रत्ययास येईल.

## लेपाक्षीचा वीरभद्र : विठ्ठलेश्वर–वीरेश्वर

'दिंडीरवनाचे रहस्य' उकलण्याच्या निमित्ताने विठ्ठल आणि वेंकटेश यांच्यातील अनेक अद्भुत साम्यांचे दर्शन आपण घेतले आहे आणि त्या साम्यांच्या आधाराने आणखी पुढे जाऊन, विठ्ठल व वेंकटेश हे विष्णुरूप पावलेले दोन्ही लोकधर्मीय देव विठ्ठल–बीरप्पा या गोपजनांच्या देवाचीच उत्क्रांत रूपे आहेत, असा संकेतही आपण प्राप्त केला आहे. विठ्ठल–बीरप्पा या धनगरी जोडदेवाचे विठ्ठल–प्राधान्याने संस्कृतीकरण / वैष्णवीकरण घडून मराठी संतांचे माहेर बनलेले पंढरपूरचे विठ्ठल हे दैवत महाराष्ट्राच्या भावविश्वाचे अधिराज्य पावले, तर वेंगडम् अथवा तिरुमलै या ठिकाणी विठ्ठल–बीरप्पाला अळवारांनी कधी विष्णु–रूपात, कधी कृष्ण–रूपात, कधी देवत्रयाच्या रूपात अन् कधी हरि-हर रूपात अनुभवले. बहुधा शैवांच्या वा वीरशैवांच्या प्रभावकाळात कुरुबांच्या या देवाचे बीरप्पा–प्राधान्याने शैवीकरण घडले / त्याला वीरभद्राचे रूप देण्यात आले आणि त्यानंतर लौकरच रामानुजाचार्यांनी विठ्ठल–वीरप्पामधील विठ्ठलाला प्राधान्य देऊन, पण वीरभद्रमूर्ती तशीच राखून त्याचे वेंकटेश्वर श्रीनिवासात रूपांतर केले. श्रीपति पंडितांनी उल्लेखिलेल्या विठ्ठलेश्वर–वीरेश्वरस्थानामधील वीरेश्वर अज्ञातात लोप पावला आणि विठ्ठलेश्वर हा विष्णुरूप बनून पुढे आला. मग, मौखिक परंपरेत प्रचलित असलेले त्याचे लौकिक चरित्रच, सर्व लोकधर्मीय कळांसह, वैष्णवदृष्टीचा रंग चढवून लोकांपुढे स्थळपुराणांच्या रूपाने मांडण्यात आले. पंढरपूरचा विठ्ठल नि तिरुमलैचा

अनुक्रमणिका

वेंकटेश यांच्या चरित्रांत, रूपांत, गुणविशेषांत, आणि इतर अनेक बाबींत जे अद्‌भुत साम्य आपणास आढळते, ते यामुळे.

विठ्ठलेश्वर–वीरेश्वर या जोडनावाने सोळाव्या शतकातील कोरीव लेखांत उल्लेखिले गेलेले आणखी एक क्षेत्र आंध्र प्रदेशात आहे. हे क्षेत्र आहे लेपाक्षी. स्थापत्य, मूर्तिशिल्प आणि चित्र या कलांचा विलक्षण सुंदर आविष्कार घडविणारे येथील वीरभद्रमंदिर उत्तर विजयनगरकालातील एक महान कलाक्षेत्र म्हणून जगभरच्या कलाप्रेमिकांत प्रसिद्ध आहे. हा लेपाक्षीचा वीरभद्र विठ्ठलाच्या शैवीकरणाचे उदाहरण म्हणून प्रा. माणिकराव धनपलवार यांनी 'विठ्ठल म्हणजे शिव' या आपल्या लेखात उल्लेखिला आहे[२५] प्रा. धनपलवार लिहितात :

"विठ्ठल हा वीरभद्ररूपानेही काही ठिकाणी पूजिला जातो. लेपाक्षी (जि. अनंतपूर) येथील वीरभद्र-मंदिरातील शके १४५९ च्या शिलालेखात वीरभद्राला 'विठ्ठलेश्वर' म्हणून संबोधले आहे. ह्यास लोक 'विरुपाक्ष-विठ्ठल' असेही म्हणतात. हे शिवमंदिर होय, याविषयी शंका नाही."

प्रा. धनपलवारांनी लेपाक्षीच्या वीरभद्राकडे केलेला हा ओझरता संकेत अत्यंत महत्त्वाचा असला, तरी तेथे घडलेल्या उन्नयन-प्रक्रियेकडे त्यांनी याहून अधिक लक्ष दिलेले नाही. मुख्यतः विठ्ठलाच्या उन्नयन-प्रक्रियेच्या बाबतीत वीरगळ > वेताळ > विठ्ठलेश्वर ( शैव ) >विठ्ठल (वैष्णव) हा क्रम त्यांना अभिप्रेत असल्यामुळे आणि आजही गोपजनांचा विठ्ठल त्यांच्या बीरप्पाबरोबर अनेक ठाण्यांत मूळरूपाने कसा नांदतो आहे, याकडे प्रा. धनपलवार यांचे दुर्लक्ष झाल्यामुळे लेपाक्षीमधील वीरभद्राचा त्यांनी अधिक वेध घेतला नाही. अन्यथा, त्यांच्या हाती आलेल्या या अद्‌भुत सामग्रीतून त्यांनीच शैवीकरणाच्या या प्रक्रियेचा नेमका आणि नीटस बोध घडविला असता.

लेपाक्षी[२६] हे क्षेत्र आंध्र प्रदेशाच्या दक्षिणेकडील सीमेवर ( बंगलोरच्या ईशान्येस ), अनंतपूर जिल्ह्यातील हिंदुपूर तालुक्यात, हिंदुपूरच्या पूर्वेस नऊ मैल अंतरावर आहे. लेपाक्षी हे आज मामुली खेडे आहे. गावाच्या दक्षिणेस 'कूर्मशैल' या नावाने पुराणप्रसिद्ध असलेला टेकडीवजा प्रचंड विस्ताराचा खडक आहे. या ठिकाणी आज पापनाशेश्वर, रघुनाथेश्वर आणि वीरभद्र या देवांची मंदिरे आहेत. यांपैकी पापनाशेश्वर हा इथला पुरातन देव होय. 'लेपाक्ष्यां पापनाशनः' असा त्याचा उल्लेख स्कंदपुराणात अडुसष्ट शैव क्षेत्रांच्या गणनेत आला आहे. गेल्या चार–साडेचार शतकांपासून मात्र लेपाक्षी हे क्षेत्र गाजते आहे, ते तिथल्या वीरभद्राच्या ठाण्यामुळेच.

विजयनगरचा राजा अच्युतदेवराय ( १५३०–१५४२ ) याच्या राज्यातील पेनुकोंडा विभागाचा समर्थ शासक विरूपण्णा याचे हे गाव. नंदी लक्कीशेट्टी आणि मुद्दमांबा यांचा तो पुत्र. वीरण्णा आणि हिरिय मल्लप्पाण्णा हे त्यांचे दोघे बंधूही त्याच्याप्रमाणेच कर्तबगार होते. पैकी वीरण्णा हा लखणापूर भागाचा शासक होता, तर मल्लप्पाण्णा हा बागूरजाजूर ( जि. चित्रदुर्ग ) भागाचा शासक होता. वीरण्णाने लेपाक्षीजवळ गोर बनहळ्ळी येथे महालक्ष्मीमंदिर ( लक्कम्मागुडी ) उभारले आणि त्यातील नित्य–नैमित्तिक उपासनेच्या खर्चासाठी व्यवस्था लावून दिली. लेपाक्षीचा वीरेश्वर हा या बंधूंचा कुळस्वामी. विरूपण्णा आणि वीरण्णा ही नावेही या देवाच्या भक्तीतूनच ठेवलेली. मल्लप्पाण्णा हे तिसऱ्या भावाचे नावही आंध्रातील गोपजनांच्या 'मल्लण्णा' या देवाच्या नावाशी नाते सांगणारे आहे. वीरुप्पण्णाने वीरण्णाच्या मदतीने लेपाक्षी येथील कूर्मशैलावर, आपल्या देवाला प्राधान्य देऊन आणि तेथील पूर्वप्रतिष्ठित देवांची प्रतिष्ठा राखून, पुढील अनेक पिढ्यांच्या चित्र–चक्षूंना चमत्कारून टाकणारा भव्य आणि सुंदर मंदिरसमूह उभारला / विजयनगर सम्राटाच्या उदार आश्रयाने उभारला. सर्वांना साधारण असणाऱ्या सभामंडपाने एकाच सलग मंदिराचे रूप पावलेला हा मंदिरसमूह, मंदिराच्या डावीकडचा भव्य, पण अपूर्ण कल्याणमंडप (खरे म्हणजे कलामंडप) आणि मंदिराच्या मागे अखंड खडकातून कोरून काढलेले अतिप्रचंड असे नागशिल्प हे सारेच काम स्थापत्यदृष्टचा भव्य, मूर्तिशिल्पदृष्टचा कमनीय आणि छत आणि भिंती यांवरील चित्रांचा विचार करता अत्यंत चित्ताकर्षक झालेले आहे.

या मंदिरसमूहात ज्याला केंद्रवर्ती स्थान दिले गेलेले आहे, ते वीरभद्राचे गर्भगृह पाचफुटी उंचीच्या








सांग-सायुध वीरभद्रमूर्तीने शोभायमान झालेले आहे. या मूर्तीच्या डावीकडे एक चिंचोळी अवघड शिळा उभी असून, ती वीरभद्रमूर्तीहूनही अधिक प्रतिष्ठित मानली जाते. इथल्या अधिष्ठातृ–देवाचा मूलविग्रह म्हणून भक्तांच्या मनात स्थान पावलेल्या या अवघड शिळेला 'वीरलिंगेश्वर' असे नाव आहे. हा मंदिरसमूह आणि त्याच्या भोवतालची वस्ती ज्या भागात आहे, त्याला येथील शिलालेखात 'लेपाक्षीचे वीरेश्वरपुर' असे म्हटले आहे; तसेच, मंदिरातील मुख्य देवाला विठ्ठलेश्वर आणि वीरेश्वर या दोन्ही नावांनी उल्लेखिले आहे.

वीरूप्पण्णादी बंधू हे वीरशैवधर्मीय होते. त्या तिघांचीही नावे गोपजनांच्या/कुरुब, गोल्ल इत्यादी जमातींच्या देवांचे स्मरण घडविणारी आहेत. त्यांनी ज्या आपल्या प्रियतम देवाचे अपरंपार वैभव वाढवले, त्याचे उन्नत रूप शिवावताराचे आणि त्याचे नाव वीरभद्र/वीरेश्वर असे असले, तरी त्याचा मूळविग्रह तेव्हापासून आजपर्यंत मंदिराच्या गर्भगृहात 'वीरलिंगेश्वर' या नावाने पूजा स्वीकारीत राहिला आहे. या नावातील 'ईश्वर' हे शोभन उत्तरपद वजा केल्यावर उरणारे खरे नाव 'वीरलिंग' एवढेच आहे, आणि ते गोपजनांच्या 'बीरप्पा' या लोकप्रिय देवाचे पर्यायनाम आहे. तसेच, येथील शिलालेखांत ज्या अर्थी या देवाला 'वीरेश्वर' या नावाबरोबरच 'विठ्ठलेश्वर' या नावानेही उल्लेखिले आहे, त्या अर्थी या ठिकाणी वीरभद्ररूप पावलेला देव नुसता बीरप्पा नव्हता, तर विठ्ठलबीरप्पा असा जोडदेव होता. त्यातल्या बीरप्पाला प्राधान्य मिळून त्याचे उन्नयन घडले, हे वीरभद्र / वीरेश्वर या उन्नत रूपाच्या साक्षीने निःशंक स्वरूपात स्पष्ट होत आहे.

विरूप्पण्णादी बंधू हे संभवतः गोपजनांपैकी होते आणि त्यांनी स्वकर्तृत्वाने राज्यवैभव प्राप्त केल्यावर आपल्या मूळच्या देवाला वीरभद्ररूप देऊन, त्याचे वैभव वाढवण्यात धन्यता अनुभवली, असे मी सूचक प्रमाणांच्या आधारे मांडले आहे. या बाबतीत एक क्षुद्र वाटणारे, परंतु दुर्लक्षिता न येणारे प्रमाण लेपाक्षीच्या मंदिरातील दोन स्तंभांवर अंकित झालेले आहे. या मंदिरांतील स्तंभांवर आणि भिंतींवर जी अनेक शिल्पे कोरलेली आहेत, त्यांत देव-देवी आहेत; ऋषिमुनी आहेत; पुराणप्रसंग आहेत; परंतु लौकिक पातळीवरची शिल्पे मुळीच नाहीत. याला अपवाद आहे, तो दोन स्तंभांवर उठावाने अंकित केलेल्या 'गोपालका'-च्या दोन शिल्पांचा.[२०] या शिल्पांत घोंगडी पांघरलेला, जमिनीवर टेकलेल्या काठीच्या वरच्या टोकावर आपल्या दोन्ही हातांचे पंजे ठेवून, त्यांवर हनुवटी टेकून देहुडाचरणी उभा असलेला धनगर वा गुराखी/गवळी कोरलेला आहे. हा धनगर वा गवळी वीरूप्पण्णाच्या पूर्वजीवनाची स्मृती तर इमानाने जागवीत राहिला नसेल ना, असे पुनः पुनः वाटत राहते. असे नसते, तर केवळ दैवी विषयांनाच इथल्या शिल्पसंभारात स्थान देणाऱ्या वीरूप्पण्णाश्रित शिल्प्यांनी अपवाद करून हा 'गोपालक' दोनदा शिल्पांकित केला नसता. अर्थात माझे हे प्रस्तुत शिल्पाविषयीचे म्हणणे केवळ स्वमतपोषणार्थ वापरलेले कल्पित आहे, असे मानून आपण सोडून दिले, तरी हरकत नाही. कारण, लेपाक्षी येथे विठ्ठल–बीरप्पाचे वीरभद्रीकरण कसे घडले, यासंबंधीची प्रबळ प्रमाणे तेथील मंदिराच्या भिंतींवरच अक्षरांकित झालेली आहेत आणि बीरप्पा–वीरभद्र–संबंधाचा मी जो विस्ताराने परिचय घडविला आहे, त्याच्या स्पष्ट पार्श्वभूमीवर ती प्रमाणे एका विलक्षण संगतीने बोलकी झालेली आहेत, याविषयी आता मला तरी यत्किंचितही संदेह वाटत नाही.

## पंढरपूर, तिरुमलै आणि विजयनगर

लेपाक्षी येथील वीरभद्रमंदिरात सर्वांत प्राचीन कोरीव लेख इ. स. १५३८ मधील आहे; म्हणजे सोळाव्या शतकाच्या द्वितीय चरणातील आहे. या काळापर्यंत पंढरपूर येथील विष्णु-कृष्ण-रूप विठ्ठलाच्या भक्तीचा प्रभाव महाराष्ट्र-कर्नाटकाच्या सीमा व्यापून राहिला होता. महाराष्ट्रातील वारकऱ्यांनी आणि कर्नाटकातील हरिदासांनी आपल्या असंख्य भावमधुर भक्तिगीतांतून त्याची दिव्य कीर्ती दक्षिणेत दुमदुमत ठेवली होती. लेपाक्षीचे वीरभद्रमंदिर विठ्ठल-बीरप्पाच्या उपासनाकेंद्रातून उभारणारे वीरूप्पण्णादी बंधू हे विजयनगरच्या राज्याचे पाईक होते, एवढेच नव्हे, तर या स्थानाला विजयनगरचा राजा अच्युतदेवराय याचाही उदार आश्रय लाभला होता. लेपाक्षीचे वीरभद्रमंदिर ज्या विजयनगरच्या राजांच्या साहाय्याने / संमतीने बांधले गेले, ते विजयनगर

त्यापूर्वीच वैष्णव विठ्ठलोपासनेचे एक गाजते केंद्र बनले होते. विजयनगरच्या विठ्ठलस्वामीमंदिरात एकूण नऊ शिलालेख आहेत. त्यांतील तीन कृष्णदेवरायाच्या कारकीर्दीतील आहेत आणि उरलेल्या सहांपैकी एक अच्युतरायाच्या काळातील व पाच सदाशिवरायाच्या काळातील आहेत. कृष्णदेवरायाचे तीनही लेख शके १४३५ (इ.स. १५१३) या एकाच वर्षातील असून, त्यांतील एकात स्वतः राजाने सूर्यग्रहणप्रसंगी आपल्या मातापित्यांच्या नावाने देवाला भूदान केले असल्याची नोंद आहे, तर उरलेल्या दोन लेखांत त्याच्या चिन्नादेवी आणि तिरुमलदेवी या दोन राण्यांनी देवासाठी केलेल्या भूदानाची व प्रत्येकीने बांधलेल्या एकेका गोपुराची नोंद आहे. अर्थातच विजयनगरचे विठ्ठलस्वामीमंदिर कृष्णदेवरायाच्याही पूर्वी बांधले गेले आहे, हे यावरून स्पष्ट होत आहे.

हा इतिहास–क्रम आपण नीट ध्यानी घेतला, तर आपल्या हे स्पष्टपणे प्रत्ययास येईल की, विष्णु–कृष्णरूपी विठ्ठलाची भक्ती महाराष्ट्र–कर्नाटकात प्रकर्षाला पोचली असताना आणि त्या भक्तीचे एक महाकेंद्र खुद्द विजयनगर येथे गाजत असताना, विजयनगरच्याच राजाच्या साहाय्याने नि संमतीने त्याचे तीन अधिकारी लेपाक्षी येथे विठ्ठलबीरप्पाचे वीरभद्रात उन्नयन घडवितात / त्याचे शैवीकरण करतात. लेपाक्षीतील विठ्ठल–बीरप्पाचे शैवीकरण हे पंढरपूरच्या विठ्ठलाच्या वैष्णवी प्रतिष्ठेचा प्रकर्ष घडल्यानंतरचे आहे / त्याची कीर्ती विजयनगरच्या वैभवशाली मंदिरातून गाजत राहिल्यानंतरचे आहे आणि विजयनगरच्या राजाच्या साहाय्याने नि संमतीने घडविलेले आहे. म्हणजेच, शैवीकरणाची अवस्था प्राचीन आणि वैष्णवीकरणाची अवस्था नंतरची, असा क्रम मांडणे इतिहासाशी विसंवादी ठरेल. शैवीकरण घडायचे की वैष्णवीकरण घडायचे, हे त्या त्या ठाण्यातील सामाजिक/धार्मिक/राजकीय परिस्थितीतूनच ठरायचे असते.

विजयनगरच्या विठ्ठलोपासनेच्या केंद्राबाबत आणखी एक महत्त्वाचा पुरावा प्रस्तुत संदर्भात काही वेगळे सांगणारा आहे. तो पुरावा आहे प्रख्यात तेलुगु वैष्णव कवी ताल्लपाकम् अन्नमाचार्य यांच्या एका विठ्ठलभक्तिपर गीताचा. अन्नमाचार्य हे वेंकटेशाचे परमभक्त. इ. स. १४०८ ते १५०३ हा त्यांचा जीवनकाळ. कृष्णदेवरायाच्या राज्यारोहणाच्या सहा वर्षे अगोदरच त्यांचे निर्याण घडले. त्यांची काही 'संकीर्तने' (भक्तिगीते) विठ्ठलाविषयी असून, त्यांतील एकात विजयनगर येथील विठ्ठलमंदिराचा, देवाच्या स्नानमहोत्सवाचा, रथमहोत्सवाचा आणि वनभोजनोत्सवाचा उल्लेख आहे. आणि आणखी विशेष म्हणजे 'वेंकटाचलाहून आलेली विठ्ठल-रुक्मिणी विजयनगरच्या मंदिरात नांदताहेत' असेही अन्नमाचार्यांनी म्हटले आहे. देव पंढरपुराहून येथे आला, असे ते म्हणत नाहीत. वेंकटेश–विठ्ठल–एकत्वाचे तर हे प्रत्यंतर नव्हे ?

### 'द्वे विरुपे' सूक्ताचे उपयोजन

लेपाक्षीच्या वीरभद्र–मंदिरातील शिलालेखांत ज्याच्या नावाची नोंद 'विठ्ठलेश्वर' आणि 'वीरेश्वर' अशी दोन्ही प्रकारे केली आहे, तो वीरूप्पण्णाचा वीरभद्रदेव विठ्ठल–बीरप्पा या गोपजनांच्या जोडदेवातून बीरप्पाप्राधान्याने उत्क्रान्त झालेला आहे, हे सत्य प्रतीत होताच मला विठ्ठलाच्या वैदिकीकरणाच्या प्रक्रियेत वापरले गेलेले एक 'साधन' ( Device) आठवले. मी मागे हे स्पष्ट केलेच आहे की, गवळी–धनगरांच्या परंपरेत बीरप्पा स्वतंत्रपणे वावरतो, परंतु विठ्ठल मात्र बीरप्पाबरोबर, बंधू / सांगाती म्हणूनच येतो. म्हणजेच विठ्ठल--बीरदेव हा जोडदेव आहे. बीरप्पा जेव्हा विठ्ठलसहित असतो, तेव्हा तो एक प्रकारे 'द्विरूप बीरप्पा' असतो / 'द्वि विरुपा' असतो. 'द्वि' या शब्दातील 'व' व्यंजनाला प्राधान्य मिळून त्याचे 'बे' असे तद्भव रूप होते, तर 'द' या व्यंजनाला प्राधान्य मिळून 'दो/दोन' असे तद्भव रूप होते. त्याचप्रमाणे विठ्ठल-बीरप्पामधील विठ्ठलाच्या प्राधान्याने कधी उन्नयन घडते, तर कधी बीरप्पाच्या प्राधान्याने उन्नयन घडते. कधी असे का घडते आणि कधी तसे का घडते, याचे उत्तर त्या त्या ठाण्यातील सामाजिक-धार्मिक परिस्थितीतच शोधावे लागते. एक गोष्ट मात्र आपण पक्की ध्यानात ठेवायला हवी की, विठ्ठलाच्या उन्नयनप्रक्रियेत प्रथम शैवीकरणाची अवस्था सर्वत्र येते आणि नंतरच वैष्णवीकरणाची अवस्था येते, असे सिद्ध होऊ शकत नाही. ही उन्नयनप्रक्रिया एकरेषीय (unilineal)

नाही, तर बहुरेषीय ( Multilineal ) आहे. उन्नयनप्रक्रियेत सापडलेल्या विठ्ठल – बीरप्पाच्या प्रत्येक ठाण्यात वेगवेगळ्या प्रकारे उन्नयन घडत राहिले आहे. हे सत्य केवळ विठ्ठल-बीरप्पापुरतेच मर्यादित नाही, तर मुरुगन्–अय्यप्पन्– अय्यनार यांसारख्या दक्षिणेतील लोकदेवांच्या ठाण्यांत अथवा लज्जागौरीसारख्या आदिम मातृदेवीच्या ठाण्यांतही आपणास उन्नयनप्रक्रियेसंबंधीच्या या सत्याचा प्रत्यय घेता येतो. 'द्वि विरुपा ' म्हणजे विठ्ठलसहित असलेला जाडदेव बीरप्पा हा जेव्हा विठ्ठलप्राधान्याने पंढरपूरला विष्णु–कृष्ण–रूप पावला, तेव्हा त्याचे महत्त्व अटळपणे स्वीकारणाऱ्या क्षेत्रोपाध्यायांनी आणि परंपरानिष्ठ पंडितांनी त्याचे वैदिकीकरण करण्याचा व्यापक प्रयत्न केला. या प्रयत्नात त्यांना त्याच्या 'द्वि विरुपा ' या स्वरूपावरून सहजच आठवले, ते ऋग्वेदातील ' द्वे विरुपे ' हे सूक्त. मग त्यांनी आपले बुद्धिकौशल्य वापरून त्या सूक्ताचा विठ्ठलपर अर्थ लावून दाखवला आणि विठ्ठल हा वेदवर्णित देव आहे, असे उद्घोषित केले. विठ्ठलाच्या वैदिकीकरणाची ही सर्व प्रक्रिया समजावून घ्यायची, तर त्यासाठी एक स्वतंत्र लेख लिहायला हवा. या वैदिकीकरणाच्या प्रक्रियेचे यशापयश समजावून घेण्यातून आपल्या या प्रियतम देवाच्या प्रभावक्षेत्रातील सामाजिक संघर्षाचे भान घडू शकेल.

---

## संदर्भ टीपा—

18. Some Notes on Birobā. the Dhangar God of Maharashtra (Science and Human Progress : Prof. D. D. Kosambi Commemoration Volume, Bombay, 1974. pp. 167–175; Prehistoric Background to Pastoralism... (Anthropos, Volume 75. 1980, pp. 163–184; Religion of the Dhangars in the Context of Some Legends, Cults and Rituals (Typed Article); etc.

१९. श्रीक्षेत्र यडूर येथील प्रसिद्ध खटला व वीरशैव समाज : करवीरापा शिवापा छब्रे, निपाणी, १९२७.

२०. तत्रैव, पृ. ७. २१. तत्रैव, पृ. ३३७. २२. तत्रैव, पृ. ३३९.

२३. तत्रैव, पृ. ३७३–७४. २४. तत्रैव, पृ. ३७, ४०, ४४, ५०.

२५. ' विठ्ठल म्हणजे शिव ' : माणिक धनपलवार ('अनुबंध' त्रैमासिक, गुलबर्गा. वर्ष पाचवे, अंक दुसरा, जुलै ते सप्टेंबर १९८१, पृ. २६–३४), पृ. २९.

26. Lepakshi : by Amancharla Gopal Rao. Hyderabad, 1969; The Art of Lepakshi : by S. Gopalakrishna Murthy; Studies in Indian History and Culture– Dr. P. B. Desai Felicitation Volume; Dharwar, 1971 ( Three Brothers of Lepakshi : Article by Sadyojata Swamiji, pp. 298–301 ).

27. Lepakshi : by Amancharla Gopal Rao. Plate No. XXVIII– A Shepherd on a pillar in the Ranga Mantapa.

28. The Journal of Oriental Research, Madras. Vol. XVI, Part II December 1946. pp. 84–90 (' The Date of the Construction of the Temples of Hazāra-Rāmasvāmi and Vitthala at Vijayanagara' ; N. Venkataramanayya).

अनुक्रमणिका








# पृथ्वीवरच्या प्रयोगशाळेत सूर्य-निर्मितीचे प्रयत्न

व. त्रि. चिपळोणकर

असे म्हटले आहे की, मनुष्याच्या आयुष्यात त्याला तीन दुःखे सारखी भिववीत असतात. ही दुःखे कोणती असे विचाराल, तर ती अशी आहेत : कष्ट केल्यावाचून तो आपली उपजीविका करू शकत नाही, हे आहे यांपैकी पहिले दुःख. मनुष्य जर काम करावयाचे थांबवेल, तर त्याला खावयास अन्नदेखील मिळणार नाही, हे उघड आहे. त्याचे शरीर नेहेमीच कार्यक्षम राहील याची शाश्वती नाही. हे आहे त्याचे दुसरे दुःख. आजार त्याला केव्हाही येऊ शकतो. आयुष्याच्या उत्तरार्धात त्याची वृद्धत्वापासून सुटका नाही; या काळात त्याची गात्रे विकलांग होतात व त्याच्या शरीराच्या कार्यशक्तीवर आणि उपभोगशक्तीवर वाढत्या प्रमाणात सारख्या मर्यादा पडत जात असतात. त्याचे तिसरे दुःख साधन-सामग्रीबद्दलचे आहे. इतर जनावरांशी तुलना करता मनुष्यास जास्त बुद्धी आहे; त्याला जाणीव पण आहे. त्यामुळे जीवनात आवश्यक अशा साधनांचा तो मोठ्या प्रमाणात वापर करतो आणि आवश्यक अशा साधनसामग्रीबद्दल त्याच्या कल्पना किंवा अपेक्षा सारख्या वाढतच चालल्या आहेत, असे दिसते. तो आपले अन्न शिजवून खातो; अन्न शिजवून खाणारा प्राणी म्हणजे मानव अशी व्याख्या पण करण्यात आली आहे. जीवनामध्ये मनुष्य अनेक साधनांचा वापर करताना आढळतो. थंडी-वारा, पाऊस यापासून बचाव करण्याकरिता त्याला घर-निवारा लागतो, अंगावर घालण्याकरिता कपडे लागतात; पाणीपुरवठा लागतो; अन्न शिजविण्या-करिता लाकडे, कोळसे यांसारखी इंधने लागतात, निरनिराळ्या प्रकारची कामे करण्याकरिता हत्यारे लागतात. समाजामध्ये मनुष्यास ही सर्व साधने मिळविण्याकरिता दुसऱ्याची मदत घ्यावी लागते म्हणून याकरिता द्रव्यविनिमय आवश्यक होतो. पुरातन काळापासून सोने हे द्रव्याचे एक प्रतीक बनले आहे. त्यामुळे सोने जर जवळ असेल, तर आवश्यक त्या सुविधा मिळविता येतात, असे अनुभवाने त्यास कळून चुकले. त्याच्याजवळ जर द्रव्य नसेल, तर त्याचे मनोरथ सफल होण्यामध्ये अनेक अडचणी येतात. काही आकांक्षा तर मनातल्या मनातच थिजून जातात. मध्ययुगीन काळापासून विज्ञानामध्ये ज्या उद्दिष्टाचा पाठपुरावा केला जात होता त्याचा जर विचार केला, तर वरील तीन दुःखांशी निगडीत अशा तीन प्रेरणा त्यामागे कार्य करीत होत्या, असे आढळते. आपोआप सतत कार्य करणारे यंत्र शोधून काढणे हे होते, त्याचे पहिले उद्दिष्ट. अशा यंत्राचा शोध का घ्यावयाचा ? यामागे कल्पना ही की, मनुष्याला जे शारीरिक कष्ट करावे लागतात ते अशा यंत्राची मदत घेऊन टाळता येतात का हे पहावे. आपल्या दैनंदिन जीवनात सध्या आपण वापरत असलेल्या यंत्रांची मनामध्ये मोजणी करा म्हणजे हा मुद्दा लक्षात येईल. आपण पूर्वी विहिरीतून दोर-बादलीच्या साहाय्याने पाणी मिळवीत होतो. आता हे काम विजेवर चालणारा पंप करीत असतो. उन्हाळ्यात उष्मा फार झाला तर पूर्वी पंखा हालवून वारा घालण्याकरिता नोकर ठेवीत असत, तर आता हे काम विजेचा पंखा करत असतो. एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जाण्याकरिता सध्याच्या काळात मोटर, आगगाडी, विमाने अशी स्वयंचलित यांत्रिक साधने उपलब्ध आहेत. स्वयंपाकघरात देखील दाणे कुटण्या-करिता विजेचा मिक्सर आहे. पण येथे हे लक्षात घेणे जरूर आहे की, ही सर्व साधने ऊर्जा पुरवल्याशिवाय काम करू शकत नाहीत. वीज-पुरवठा बंद झाला तर पंखा, मिक्सर काम करू शकत नाहीत; पेट्रोल नसेल तर मोटर चालू



अनुक्रमणिका

शकणार नाही; कोळसा नसेल तर आगगाडी पण चालणार नाही. तसा विचार केला तर मनुष्यसुद्धा ऊर्जा पुरवठयाशिवाय काम करू शकत नाही. तो जे अन्न खातो त्यावर त्याच्या शरीरात प्रक्रिया होते व त्यायोगे जी ऊर्जा विमुक्त होऊन उपलब्ध केली जाते, तीवर त्याचे सर्व व्यवहार चालत असतात. या सर्व प्रक्रियेविषयीची स्पष्ट कल्पना मध्ययुगातील लोकांस नव्हती म्हणून त्यांना असे वाटत होते की, जर ऊर्जापुरवठा केल्याशिवाय कार्य करणारे यंत्र बनविता आले, तर किती बरे होईल ? मनुष्यास करावयास लागणाऱ्या कष्टाची समस्या कायमची सोडविता येईल. हे उद्दिष्ट साध्य करण्याच्या प्रयत्नांमधूनच प्रथम साधी यंत्रे, नंतर इंजिने व आणखी नंतर निरनिराळ्या प्रकारच्या स्वयंचलित योजना यांचा शोध लागला व त्यामुळेच आधुनिक काळामधील यांत्रिकीकरण साध्य झाले. सध्याचे संगणक नेमून दिलेलेच कार्य करतात असे नसून काही नवे संगणक जवळजवळ मनुष्याप्रमाणेच विविध समस्या व त्यांवर उपलब्ध होऊ शकणाऱ्या उपाययोजना यांविषयी साधकबाधक विचार करू शकतात. ही प्रगती अशीच होत गेली, तर अशी कल्पना करता येईल की, काही शतकांनंतर जन्मास येणाऱ्या मनुष्यास घर सोडून ऑफिसमध्ये जाऊन काम करण्याची आवश्यकता पण राहणार नाही. तो आपल्या घरातच बसून विजेच्या बटनाची फिरवा-फिरव करून तेथून काही अंतर दूर असणाऱ्या यंत्र-शाळेमधील यंत्रावर संगणकामार्फत देखरेख करून आवश्यक त्या सूचना देऊन आपणास हवे असे सर्व प्रकारचे काम करून घेऊ शकेल. ही घटना प्रगतीचे निर्देशन करील की नाही, याचे उत्तर देणे कठीण होईल. सध्याच टी. व्ही. चा वापर वाढल्यामुळे काय परिस्थिती निर्माण झाली आहे ती पहा. या पूर्वीचे लोक संध्याकाळी बाहेर फिरावयास जात; निरनिराळे खेळ स्वत: खेळत असत व इतर सांस्कृतिक कार्यक्रमांत भाग घेत असत. सध्या समाजातील एक मोठा वर्ग संध्याकाळी आपल्या घरात स्वत:ला कोंडून घेऊन टी. व्ही. चे कार्यक्रम बघण्याचे कार्य करीत असतो. भविष्य-काळात मनुष्याला आपले घर सोडण्याचीही आवश्यकता जर न राहील, तर तो स्वतःच आपल्याला कैद करून ठेवील, असे म्हटले तर त्यात चूक नसावी.

चिरकालीन तारुण्य व अमर्याद आयुष्य प्रदान करणारे अमृत किंवा रामबाण औषध शोधून काढावयाचे हे मनुष्याचे दुसरे महत्त्वाचे असे उद्दिष्ट होते. त्याला प्रत्यक्ष अमृत जरी सापडले नाही, तरी निरनिराळ्या रोगांचे निर्मूलन करणारी औषधे त्यास मिळाली. गेल्या काही वर्षांत सामान्य मनुष्याच्या सरासरी आयुर्मर्यादेत जी वाढ झाली आहे ती लक्षणीय आहे व या घटनेचे श्रेय मनुष्याने वैद्यकीय विज्ञानात केलेल्या प्रगतीकडेच येते. परिसाचा शोध हे त्याचे तिसरे उद्दिष्ट द्रव्य मिळ-विण्याकरिता होते. परिसाच्या निव्वळ स्पर्शाने हीन धातूचे सोन्यात रूपांतरण करता येते, असा समज त्यावेळी प्रचलित होता. या प्रयत्नात अजून परीस सापडला नसला, तरी भौतिकी प्रयोगशाळेत हलक्या धातूच्या अणूचे दुर्मीळ व मौल्यवान धातु-अणूमध्ये रूपांतरण करण्याची किमया मोठ्या प्रमाणात साध्य झाली आहे, असे म्हणता येते. एका सोन्याच्या खाणीच्या कार्याचे विनोदप्रचूर जे खालील वर्णन करण्यात आले आहे ते या किमया प्रयोगाला लागू पडते : ही खाण आता इतकी जुनी व अकार्यक्षम झाली आहे की तीमधून १० ग्रॅम वजनाचे सोने मिळविण्याकरिता २० ग्रॅम वजनाच्या सोन्याच्या किंमतीएवढा खर्च करावा लागतो. हा मुद्दा सोडला तर मनुष्याच्या या धडपडीपासून रासायनिकी या महत्त्वाच्या विज्ञानशाखेचा विकास झाला, याबद्दल काही संशय नाही. आपले कष्ट वाचविण्याकरिता मनुष्याने जे प्रयत्न केले, त्या-करिता जी यंत्रे व उर्जा-उद्गम शोधून काढले, त्यांचे वर्णन लेखाच्या पुढील भागात केले आहे.

यंत्रे चालविण्याकरिता ऊर्जा-उद्गम आवश्यक असतात, हे मनुष्याच्या लवकरच लक्षात आले. त्याने प्रथम शोधलेली यंत्रे (उदा., कुंभाराचे चाक, धनुष्यबाण, चरखा) त्याच्या बाहुबलावर म्हणजे त्याच्या कार्यशक्तीवर चालत असत. प्रगतीच्या पुढील टप्प्यात त्याने या कार्याकरिता इतर अधिक बलवान अशा पाळीव जनावरांचा उपयोग करणे सुरू केले उदा; नांगर चालविण्याकरिता तो बैल किंवा घोड्याचा उपयोग करू लागला, तर गाडी

अनुक्रमणिका

ओढण्याकरिता तो घोडा वापरू लागला. पण या पद्धतीमध्ये असणाऱ्या अंगभूत मर्यादा त्याच्या लवकरच लक्षात आल्या. पाळीव जनावरांस खाण्यास द्यावे लागते; त्यांना थकवा येतो व त्यांच्या काम करावयाच्या शक्तीवर मर्यादा असतात. या कारणांकरिता त्याने आपली दृष्टी स्वयंचलित यंत्राकडे वळविली असावी. यंत्र कार्यान्वित करण्याकरिता इंजिन लागते व इंजिनाला इंधनाच्या स्वरूपात सतत ऊर्जा पुरवठा करावा लागतो. यंत्राला थकवा येत नाही; पण त्यावर सारखी देखरेख करावी लागते. ऊर्जेचा पुरवठा न करता सतत कार्य करणाऱ्या इंजिनाचा शोध लावण्याचे उत्कट प्रयोग मध्ययुगात केले गेले.

या संदर्भात इंग्लंडमधील भौतिकीविज्ञ लॉज याच्या रेमंड नावाच्या मुलाची हकीगत मनोरंजक आहे. रेमंडचा भुताखेतावर विश्वास होता व त्याला असे वाटावयाचे की, जर एखाद्या भुताला पकडून त्याला विद्युत जनित्र सतत फिरविण्याचे काम करण्याची सक्ती केली, तर या योगे मनुष्यास काही ऊर्जा खर्च न करता मोफत वीज मिळू शकेल. हा प्रयोग अमलात आणावयाच्या पूर्वीच रेमंड पहिल्या महायुद्धाच्या वेळी फ्रान्सच्या रणभूमीवर मरण पावला. रेमंडला सुचलेली कल्पना पुरातन काळापासून मनुष्याच्या मनात घर करून राहिली आहे, असे वाटते. आपल्या पुराणातील कामधेनूची कल्पना किंवा लोकसाहित्यामधील राक्षसाची कल्पना या दोन्ही वरील हकीगतीमधील कल्पनेशी जुळणाऱ्या अशाच आहेत. ब्रिटिश एन्सायक्लोपिडीयामध्ये आपोआप सतत चालणाऱ्या यंत्राचा शोध घेण्याकरिता केलेल्या आजतागायतच्या सर्व महत्त्वाच्या प्रयत्नांचे सविस्तर वर्णन दिले आहे. हे वर्णन वाचल्यानंतर मनुष्याच्या कल्पनाशक्तीचे जेवढे कौतुक करावे तेवढे थोडेच असे वाटू लागते. या प्रयत्नांमध्ये भारताने काही वाटा उचलला असा उल्लेख मिळत नाही. अनेक वर्षे प्रयत्न केल्यानंतर मनुष्याला असे कळून चुकले की, असे यंत्र कोणीही कधीही बनवू शकणार नाही; पण या प्रयत्नांतच त्याने पहिले स्वयंचलित यंत्र जे बाष्पयंत्र याचा शोध लावला. पाणी व कोळसा या इंधनाचा पुरवठा केला असता हे यंत्र इष्ट ते काम करू शकते. यंत्राला जी ऊर्जा पुरविली जात असते ती रासायनिक स्वरूपाची असते. कोळशाचे जेव्हा ज्वलन होते तेव्हा त्याचा हवेतल्या ऑक्सिजनबरोबर संयोग होऊन जी ऊर्जा मुक्त होते, तिच्या योगे पाणी तापविले जाऊन त्याची वाफ बनविली जाते. उष्ण वाफेमधील रेणूंना गतिज ऊर्जा असते. त्यामुळे वाफेला दाब असतो. वाफेच्या दाबाचे यांत्रिक कार्यशक्तीत रूपांतर नंतर केले जाते. अशा प्रकारे बाष्प इंजिनाच्या निरनिराळ्या घटक योजनेच्या साहाय्याने कोळशामधील रासायनिक ऊर्जेचे अखेर यांत्रिक कार्यशक्तीत रूपांतरण केले जाते. कोणत्याही इंजिनाच्या साहाय्याने त्याला पुरविलेल्या ऊर्जेपैकी काही अल्प अंशाचेच इष्ट अशा यांत्रिक कार्यशक्तीत रूपांतरण होऊ शकते असे संशोधनाने आढळून आले. अशा प्रकारे ऊष्मागतिकीचे दोन मूलभूत नियम मनुष्यास कळून चुकले. यांपैकी पहिल्या नियमाप्रमाणे ऊर्जा अविनाशी आहे : ती निर्माण करता येत नाही व तिचा नाश पण करता येत नाही. मात्र योग्य इंजिनाच्या साहाय्याने तिचे रूपांतरण एका स्वरूपातून दुसऱ्या प्रकारात करता येते. दुसऱ्या नियमाप्रमाणे कोणतेही इंजिन जेव्हा ऊर्जेचे रूपांतरण करीत असते तेव्हा ते त्याला पुरविल्या गेलेल्या संपूर्ण ऊर्जेचे दुसऱ्या प्रकारात रूपांतरण करू शकत नाही. उदा; बाष्पइंजिनाला जी औष्णिक ऊर्जा पुरविली जात असते तीपैकी फक्त २०–३० टक्केच भागाचा ते उपयुक्त अशा यांत्रिक कार्यशक्तीत रूपांतरण करू शकते. कोणत्याही इंजिनामध्ये पुरविलेल्या ऊर्जेचा अधिकांश भाग हा वायाच जात असतो. जगामध्ये मनुष्य वापरीत असलेल्या विविध प्रकारच्या इंजिनांचा साकल्याने विचार केला, तर मनुष्य केवढ्या मोठ्या प्रमाणात ऊर्जा वाया घालवीत आहे, याची कल्पना करता येते. इंजिनामध्ये सुधारणा करुन त्याला अधिक कार्यक्षम करून पुरविलेल्या ऊर्जेचे संपूर्णपणे यांत्रिक कार्यशक्तीत रूपांतर करता येईल, असे यापूर्वी तात्त्विक (सैद्धांतिक) दृष्ट्या तरी शक्य वाटत होते; पण हा समज चूक आहे, असे ऊष्मागतिकीच्या दुसऱ्या नियमाने दाखवून दिले. आधुनिक अणुऊर्जेचा उपयोग करणाऱ्या कोणत्याही प्रणालीचे कार्य बघितले, तरी ते वरील दोन नियमांना संभाळूनच

होत असते, असे आढळते. अणूपासून उपलब्ध होणारी ऊर्जा ही रासायनिक स्वरूपाची नसून ती द्रव्यमानापासून मिळत असते. तिचे मूल्य आइन-स्टाइन यांच्या $E = mc^2$ या सूत्रानुसार मिळते. येथे E= ऊर्जा, m = पदार्थाचे द्रव्यमान, c = प्रकाशवेग. द्रव्यमान म्हणजे ऊर्जेचाच एक प्रकार असा या वरील समीकरणाचा अर्थ लावता येत असल्यामुळे काही विशिष्ट परिस्थितींमध्ये ही ऊर्जा व्यक्त स्वरूपात मिळवून तिचे शेवटी योग्य इंजि-नाच्या साहाय्याने इष्ट अशा यांत्रिक कार्यशक्तीत रूपांतरण करता येते. पदार्थ अणूच्या द्रव्यमानाचे व्यक्त ऊर्जेत रूपांतरण करण्याकरिता एकमेकांच्या सर्वस्वी उलट असे दोन मार्ग व्यवहारात उपलब्ध आहेत. युरेनियमसारख्या जड अणूचे विघटन करून त्यांचे लहान द्रव्यमान असणाऱ्या घटक अणूंत रूपांतर केले असता या घटक कणांना एकत्र बांधून ठेवणारी ऊर्जा बाहेर टाकली जाते. याउलट हायड्रो-जन, ड्युटेरीयम किंवा ट्रिटीयम (ड्युटेरीयम व ट्रिटीयम हे हायड्रोजन अणूचे अनुक्रमे दुप्पट व तिप्पट द्रव्यमान असणारे अणुप्रकार आहेत) यांसारख्या हलक्या द्रव्यमानाच्या अणूंना एकत्र आणून त्यांचे संघटन केल्यास या क्रियेमध्ये ऊर्जा मुक्त केली जाते. सूर्यावर अशी प्रक्रिया सतत चालू आहे व त्यामुळेच त्याचे प्रखर तापमान कायम ठेवले जाते, ही गोष्ट शास्त्रज्ञांना काही वर्षांपासून ज्ञात झाली होती. हायड्रोजन अणू अशा प्रकारे एकत्र येऊन संघटित झाले असता त्यांपासून हीलियमअणू निर्माण होतात (हीलियम या अणुद्रव्याचा शोध प्रथम सूर्यावरच लागला. सूर्याकरिता असलेल्या हीलीओस या नावा-वरूनच हीलियम ही संज्ञा निर्माण झाली). कोण-तीही विक्रिया घडवून आणण्याकरिता तिला अनुकूल अशी भौतिकीय परिस्थिती प्रथम निर्माण करावी लागते. सूर्याच्या अंतरंगात कित्येक दशलक्ष अंश केल्व्हीन एवढे उच्च तापमान असल्यामुळे ही विक्रिया तेथे घडणे शक्य होते. अशा उच्च तापमानाच्या अणूंना खूप मोठी गतिज ऊर्जा असते. त्यामुळे त्यांचे जेव्हा प्रथमच परस्परांबरोबर आघात होतात, त्या वेळी या आघातांमुळे अणूमधील इलेक्ट्रॉन त्यापासून दूर केले जातात. अशा प्रकारे ऋण व घन असे दोन विरुद्ध प्रकारचे विद्युतभार ज्यांवर आहेत अशा घटककणांत त्याचे या आघातांमुळे विभाजन होते. दोन विरुद्ध स्वरूपांचे विद्युतभारित कण ज्या माध्य-मात सर्वत्र सारख्या प्रमाणात आढळतात त्यास प्लाझ्मा अथवा आयनद्रायू असे म्हणतात. वर नमूद केल्याप्रमाणे हायड्रोजन प्लाझ्माचे तापमान पुरेसे उच्च असेल, तर त्यामधील घन विद्युतभारित कणांच्या एकमेकांबरोबर होणाऱ्या आघातांमुळे अणुसंघटन विक्रिया सुरू होईल व परिस्थिती अनु-कूल असल्यास ती स्वयंपोषक पण होऊ शकेल, असे दाखविता येते. याचा अर्थ असा होतो की, प्रथम बाहेरून ऊर्जेचा पुरवठा करून प्लाझ्मा माध्यमाचे तापमान वाढविणे आवश्यक असते आणि एकदा का ही विक्रिया सुरू होऊन त्यामुळे ऊर्जा बाहेर फेकली जाऊ लागली की, प्लाझ्माच्या तापमानात सारखी वाढ होत जाते. या क्रियेमध्ये असा एक टप्पा येतो की, ही विक्रिया एकदा सुरू करून दिली असता तिच्यापासून उत्सर्जित होणाऱ्या ऊर्जे-मुळेच ती अखंडपणे सतत चालू ठेवली जाते. विक्रिया चालू करण्याकरिता मात्र त्यामध्ये बाह्य कारक क्रियेची प्रथम आवश्यकता असते व त्यासाठी काही अत्यल्प कालावधीसाठी बाहेरून ऊर्जा पुरवठा करावा लागतो. या कारक क्रियेमागील तत्त्व खालील उदाहरणावरून स्पष्ट होईल. स्वयंपाकघरातील गॅसची शेगडी पेटवण्याकरिता ज्वालक आगकाडीची आवश्यकता असते. प्रदीप्त आगकाडीच्या साहाय्याने शेगडीमधून बाहेर पडणाऱ्या गॅसच्या एका लहान मर्यादित अशा घनफळाचे तापमान वाढवून गॅसच्या ज्वलनबिंदूपर्यंत नेले जाते व त्यामुळे त्या भागातच प्रथम ज्वलनक्रिया सुरू होते. ज्वलनक्रियेमुळे जी ऊर्जा बाहेर पडते ती नंतर सर्वत्र पसरून शेगडी-मधील ज्वलनक्रियेस स्वयंपोषक स्वरूप धारण कर-ण्यास मदत करते. प्रयोगशाळेत ड्युटेरीयम वायूच्या (साध्या वातावरणापेक्षा ज्याचा दाब $\frac{१}{१००००}$ पटीने कमी आहे अशा अवस्थेत) एका लहान विभागाचे तापमान १ ते $\frac{१}{१०}$ सेकंद कालावधीकरिता अंदाजे १०० दशलक्ष अंश केल्व्हीन या तापमानापर्यंत नेल्यास त्यांमध्ये अणुसंघटन विक्रिया सुरू होऊन ती स्वयंपोषक स्वरूप धारण करेल, असा अंदाज गणित करून करण्यात आला आहे. येथे हा प्रश्न विचारता येईल की, या प्रयोगाकरिता हायड्रोजनऐवजी ड्युटे-

रियम हा वायूच का वापरावयाचा ? याचे उत्तर असे आहे की, पृथ्वीवरील अणुसंघटन प्रयोगाकरिता हायड्रोजनऐवजी ड्युटेरियम वापरणे अनेक दृष्टीने सोयीस्कर ठरते (संघटन विक्रिया सुरू करण्याकरिता लागणाऱ्या प्राथमिक क्रांतिक तापमानाचे मूल्य, विक्रियेत मुक्त होणाऱ्या ऊर्जेचे मूल्य इत्यादी). वरील विधानात ड्युटेरियमचा दाब, क्रांतिक तापमान व हे क्रांतिक तापमान ज्या किमान कालावधी-करिता प्रस्थापित करणे आवश्यक असते त्याचे मूल्य, अशा तीन राशी निर्देशित केल्या गेल्या आहेत. यांपैकी कोणत्याही एका राशीत थोडाफार बदल करणे शक्य असते; पण अशा परिस्थितीत उरलेल्या राशींत तदनुरूप बदल घडवून आणावा लागतो, हे लक्षात ठेवावे लागते.

प्रयोगशाळेत या प्रकारचे प्रयोग सुरू करण्या-पूर्वी तीन महत्त्वाच्या अशा गोष्टींबद्दल प्रथम विचार करावा लागतो : १) ड्युटेरियम प्लाझ्मा निर्मिती, २) प्लाझ्मा तापमानात वाढ व ३) तप्त प्लाझ्माचे संधारण अशा या तीन प्रक्रिया आहेत. या प्रयोग-शाळेत कशा संपन्न करावयाच्या, हा महत्त्वाचा प्रश्न असतो. यांपैकी पहिल्या गोष्टीचे उत्तर सर्वांत सोपे आहे. कोणत्याही कमी दाबाच्या वायूमध्ये योग्य अशा उच्च प्रतीचा विद्युतदाब लावून, विद्युतप्रवाह सोडला असता त्याचे प्लाझ्मात रूपांतर होते, हे आता सर्वांस माहीत झाले आहे. वायूचा दाब कमी असेल, तर त्यामध्ये विद्युत संवहन मिळविण्या-करिता लागणाऱ्या क्रांतिक विद्युतदाबाचे मूल्य पण कमी असते. उदा; वातावरणाएवढा दाब असलेल्या एक सेंटीमीटर लांबी असलेल्या हवेच्या स्तंभात संवहनाकरिता सुमारे १४ हजार व्होल्टचा विद्युत दाब लागतो. प्रत्येकाच्या घरात असणारी प्रदीप्त नलिका ही एक प्लाझ्मा प्रयुक्तीच आहे. नलिके-मध्ये कमी दाबाची पाऱ्याची वाफ असते. वाफेचा दाब कमी असल्यामुळे घरोघरी उपलब्ध असलेल्या काही शतक होल्ट विद्युतदाबाच्या योगे तीमधून विद्युत संवहन मिळविणे शक्य होते. उच्च प्रतीच्या तापमानाच्या प्लाझ्माचे संधारण करण्याकरिता असलेल्या आवरणाच्या भिंतीमध्ये असामान्य गुण-धर्म पाहिजेत, हे उघड आहे. नाहीतर प्लाझ्मा तापवून त्याचे तापमान काही दशलक्ष अंशांपर्यंत नेले, तर प्रथम आवरणाच्या भिंती, नंतर प्रयोग-शाळा व त्यानंतर सभोवतालचा परिसर या सर्वांचे उष्णतेमुळे बाष्पीभवन होऊन सर्वनाश होण्यास वेळ लागणार नाही. हिरोशीमावर जेव्हा अणुबाँब टाकला गेला त्यावेळी तेथे या प्रकारची आपत्ती कोसळली होती. अणुबाँब व प्रयोगशाळेत चाललेले उच्च तापमानाच्या प्लाझ्मावरचे प्रयोग यांमध्ये एक महत्त्वाचा फरक आहे. पहिली विक्रिया स्फोटाच्या स्वरूपाची आहे, तर दुसरी पूर्णपणे नियंत्रित अशी आहे. सूर्यावर प्रदीप्त वायू प्लाझ्मा आहे. त्याचे संधारण कसे होते ? सूर्याच्या गुरुत्वाकर्षण क्षेत्रा-मुळे हे कार्य होत असते, असे कळून येते. पृथ्वीला सुद्धा गुरुत्वाकर्षणीय क्षेत्र आहे, पण त्याची शक्ती प्लाझ्मा संधारण करण्याएवढी मोठी नाही. पृथ्वीभोवती जे वातावरण आहे, त्यास हे क्षेत्र संभाळू शकले आहे. पृथ्वीभोवतालच्या वाता-वरणात नायट्रोजन, ऑक्सिजन इ. घटक वायुकण आहेत. पृथ्वीचे गुरुत्वाकर्षणीय क्षेत्र पुरेसे शक्ति-शाली असल्यामुळे वातावरणामधील वायुकण त्यांना गतिज ऊर्जा असली, तरीसुद्धा ते अवकाशात निसटून जाऊ शकत नाहीत. ते वातावरणामध्येच स्थानबद्ध होऊन राहतात. मंगळावर (व चंद्रावर) सुद्धा एकेकाळी असेच वातावरण होते, असा अंदाज करण्यात आला आहे. पण त्यांची गुरुत्वाकर्षणीय शक्ती कमी प्रतीची (त्याच्या द्रव्यमान व आकारा-नुसार) असल्याने त्यामधील वायुकण काल-परत्वे अवकाशात निसटून गेले व सध्या तेथील वातावरणात उपलब्ध वायुकणांची संख्या फारच कमी आहे, असे अनुमान करण्यात आले आहे. तेथे अवकाशयान पाठवून व त्यायोगे तेथील परिस्थितीचे परीक्षण करून वरील अंदाज खरा आहे, याबद्दल प्रत्यक्ष पुरावा मिळविण्यात आला आहे. पृथ्वीवरील प्रयोगशाळेत अशा प्रकारे उच्च तापमानाच्या प्लाझ्माचे संधारण तिच्या गुरुत्वाकर्षणीय क्षेत्राच्या साहाय्याने करता येणे शक्य नाही, असे दाखविता येते. हे कार्य चुंबकीय क्षेत्राच्या द्वारे सिद्ध करता येते. प्लाझ्मामधून जो प्रचंड विद्युतप्रवाह (काही लक्ष अँपिअर या मूल्याचा) वाहतो त्यामुळे त्याभोवती एक प्रबळ असे चुंबकीय क्षेत्र निर्माण होते. हे स्वनिर्मित चुंबकीय क्षेत्र व विद्युतप्रवाह यांमध्ये परस्परक्रिया

अनुक्रमणिका

होऊन एक यामिकी प्रेरणा निर्माण होते व ही प्रेरणा प्लाझ्मावर सर्व बाजूंनी दबाव आणून त्यास संधारणपात्राच्या मध्यभागी केंद्रित करीत असते. (पावसाळचात आकाशामधून विजेचा लोळ जेव्हा जमिनीवर पडतो तेव्हा त्याचे स्वरूप पण अशाच केंद्रित स्वरूपाचे असते; याच्या केंद्रीकरणाकरिता इतरही अनेक कारणे असतात, हे येथे नमूद केले पाहिजे,) केंद्रीकरण क्रियेमुळे संधारणपात्राची भिंत व मध्यभागी असलेला तप्त प्लाझ्मा यांमध्ये एक प्रकारचा निर्वात बांध तयार होतो व यामधून उष्णता संक्रमण होऊ शकत नाही. प्लाझ्मावर याशिवाय बाहेरून योग्य प्रकारचे सहाय्यक चुंबकीय क्षेत्र लावले, तर या क्रियेमध्ये प्रकर्षाने वाढ करता येते. चुंबकीय संधारणेचा असा अर्थ होतो की, प्लाझ्मा व त्याभोवती असलेल्या आवरणाच्या भिंती यांमध्ये उच्च प्रतीचे औष्णिक निरोधन होते. त्यामुळे विद्युत प्रवाहाच्या मूल्यात वाढ करून प्लाझ्माचे तापमान खूप वाढविले, तरी प्लाझ्मामधील औष्णिक ऊर्जा आवरणाच्या भिंतीपर्यंत जाऊ शकत नाही. ती मध्येच थांबविली जाते. दंडगोल आकाराच्या नळीत निर्माण केलेल्या प्लाझ्मावर चुंबकीय क्षेत्र लावून संधारण केले, तरी दंडगोलाच्या दोन टोकांकडील भागातून प्लाझ्मामधील घटक कण निसटून जाऊ शकतात. ते औष्णिक ऊर्जा घेऊन जात असल्यामुळे या दिशेने औष्णिक ऊर्जेचे क्षरण होणे थांबत नाही. त्यामुळे संधारण पुरेसे कार्यक्षम करण्याकरिता दंडगोल नळीची लांबी जवळ जवळ ६ मैल असणे आवश्यक आहे, असे दाखविता येते. हा आकार काही व्यवहार्य स्वरूपाचा नाही. त्यामुळे या विभागातील क्षरण परिणाम कमी करण्याकरिता काही प्रयोगशाळांत दंडगोलाच्या दोन टोकांशी चुंबकीय क्षेत्र परावर्तक योजना वापरल्या जातात, तर इतर काही प्रयोगशाळांत प्लाझ्मा नलिका मोटर टायरसारखी अंतहीन केली जाते. या दोन्ही प्रकारच्या योजनांमुळे दंडगोलाच्या आवश्यक लांबीत खूपच घट करता येते. पाण्याचे तापमान वाढवून ते उकळवले तर त्यामध्ये बुडबुडे इ. प्रकारचे विक्षोभ निर्माण होऊन तापणारा पाणीस्तंभ ज्याप्रमाणे अस्थिर बनतो त्याचप्रमाणे प्लाझ्मामध्ये विद्युत प्रवाह सोडून त्याचे आकुंचन करून त्याचे तापमान वाढविले असता विक्रियेच्या एका ठराविक टप्प्याला त्यामध्ये अनेक ठिकाणी स्थानिक अस्थिरता निर्माण होतात, असे आढळते. प्लाझ्मामधून जाणाऱ्या विद्युतप्रवाहाचे मूल्य अचानक वाढविले, तर त्यामुळे त्याचे तापमान जूल परिणामानुसार वाढतेच पण चुंबकीय क्षेत्रामुळे त्याचे जे असंक्रमी आकुंचन होत असते त्यामुळे सुद्धा त्याच्या तापमानात खूप वाढ होत असते. प्लाझ्माचे तापमान वाढवावयाची ही एक सोपी व प्रभावी रीत आहे. प्लाझ्मा तापविला असता त्यामध्ये ज्या अस्थिरता निर्माण होतात त्यांविषयीचे तात्त्विक विश्लेषण बोम या अमेरिकन शास्त्रज्ञाने प्रथम केले. त्याने असे दाखविले की, या अस्थिरता प्लाझ्माच्या काही ठराविक मर्यादित स्वरूपाच्या परिस्थितीतच निर्माण होतात. बोमने निर्देशित केलेल्या मर्यादेच्या बाहेर प्लाझ्मा कार्यान्वित केला असता या अस्थिरता निर्माण होण्याचा संभव कमी असतो. बोम मर्यादेच्या अटीप्रमाणे स्थिर प्लाझ्मा निर्माण करण्याकरिता निरनिराळ्या प्रायोगिक योजना वापरून गेल्या १०–२० वर्षांत अनेक प्रयत्न केले गेले आहेत. अमेरिका, रशिया व इतर प्रगत राष्ट्रे यांनी या बाबतीत एकमेकांशी चांगले सहकार्य केल्यामुळे या विषयात त्या मानाने बरीच लवकर प्रगती झाली. टोकोमॅक या रशियन प्रयोगात इंग्लिश क्रमांक 8 या आकाराच्या आवरणात बंदिस्त केलेल्या प्लाझ्मावर एकाच वेळी दोन चुंबकीय क्षेत्रे वापरलेली असतात व त्यामुळे या योजनेत स्थिर प्लाझ्मा मिळतो, असे दाखविण्यात आले. हीच रीत विशेष यशस्वी होईल असा भरवसा वाटत असल्यामुळे सध्या अमेरिकेत व इतर देशांतसुद्धा याच प्रकारच्या योजनेवर प्रयोग चालू आहेत. या प्रकारच्या योजनेत प्लाझ्मा आवरणाचा काटच्छेद व्यास २२५ ते २६५ सेंटीमीटर असून त्याच्या मध्यभागी केंद्रित केलेल्या गेलेल्या प्रत्यक्ष प्लाझ्माचा व्यास ३० ते ९० सेंटीमीटर एवढाच असतो. चुंबकीय संधारणेऐवजी निरूढी संधारण ही पर्यायी रीत पण या संशोधनात वापरली जाते. तिचे वर्णन पुढे केले आहे.

प्लाझ्माचे तापमान वाढविण्याकरिता ज्या अनेक व्यवहारी पद्धती उपलब्ध आहेत त्यांवर संशोधन चालूच होते. यांमध्ये विद्युतप्रवाहाद्वारा ओहमिक

रीत्या प्लाझ्माला तापवावयाची पद्धत ही सर्वांत सोपी असते. घरोघरी असलेल्या विजेच्या बल्ब-मधील तंतूला प्रदीप्त करण्याकरिता हीच पद्धत वापरली जात असते. तंतूला रोध असतो व त्यामधून विद्युतप्रवाह पाठविला असता विद्युत ऊर्जेच्या काही भागाचे ( जूल परिणामानुसार ) उष्णतेमध्ये रूपांतर होत असते. तंतू तापून त्याचे तापमान जसे वाढत जाते तसा त्याचा रोधही वाढत जातो. (तप्त तंतूचा रोध त्याच्या कोठी-परिसर तापमानावर असलेल्या मूळ मूल्याच्या जवळ जवळ दहा पटींनी वाढतो). धातूच्या तंतूचा रोध त्याच्या तपमानाबरोबर वाढत जातो, तर प्लाझ्माचा रोध या उलट कमी होत जातो, ही या संदर्भात लक्षात ठेवण्याजोगती गोष्ट आहे. घरा-मधील विद्युत पुरवठा करणाऱ्या मेन्सच्या तारांचा रोध अत्यल्प असल्यामुळे विद्युत प्रवाह त्यामधून जात असला, तरी त्यांच्या तापमानात विशेष फरक पडत नाही, ही सर्वांच्या अनुभवाची अशी गोष्ट आहे. दहा दशलक्ष अंश तापमानाच्या प्लाझ्माची विद्युत संवहकता साधारणपणे तांब्याच्या संवाहकते-एवढी होते हे लक्षात घेतले, तर जूल/ओहनिक परिणामाचा उपयोग करून प्लाझ्माला ३० दशलक्ष अंशाच्या पुढे तापविणे का शक्य (किंवा कार्यक्षम) होत नाही, याचे उत्तर मिळते. या पुढील तापमान पल्ल्यात प्लाझ्माला तापविण्याकरिता नवीन पद्धती वापराव्या लागतात. यांमध्ये खालील तीन पद्धतींचा मुख्यत्वेकरून उपयोग केला जातो. १) उच्च ऊर्जाधारी निर्भारीत कण शलाकेचे लाझ्मामध्ये अंतःक्षेपण २) रेडिओ कंप्रता तरंगांद्वारा प्लाझ्माला तापविणे व ३) लेसर शलाकेच्या द्वारे प्लाझ्माला तापविणे. विद्युतभारित अणुकणांना प्रवेगित करण्या-करिता सायक्लोट्रॉन इ. अनेक यंत्रे उपलब्ध आहेत. अशा रीतीने प्रवेगित केलेल्या अणुकणांचे योग्य विक्रियेच्या साहाय्याने निर्भारीकरण करून मिळणारी उच्च ऊर्जाधारी विद्युतभारहीन (तटस्थ) कण शलाका प्लाझ्मात सोडली, तर प्लाझ्मामधील घटक अणुकण व शलाका कण यांमध्ये परस्पर आघात होऊन त्यांमध्ये ऊर्जा विनिमय होतो व परिणामी प्लाझ्मा कणांचे तापमान वाढते. आधुनिक भौतिकी-प्रमाणे कोणत्याही कणसमूहाचे तापमान त्यामधील घटक कणांच्या सरासरी इतस्ततः गतिज ऊर्जेच्या मूल्यावरून निश्चित होत असते. एक उष्ण तर दुसरा त्यापेक्षा थंड असणाऱ्या दोन वायूंचे मिश्रण केले असता त्यांमध्ये वायुकणांच्या परस्पर आघातांमुळे उष्णता विनिमय होतो. मिश्रणामुळे थंड वायुकणांच्या तापमानात वाढ तर उष्ण वायुकणांच्या तापमानात घट होऊन दोन्हीही वायुकणांचे तापमान एकसमान पातळीवर येते. उच्च कंप्रतेचे विद्युत तरंग संवाहकात सोडले असता त्यायोगे संवाहकाचे तापमान वाढविता येते. रेडिओ कंप्रता प्रवर्तकत्व भट्टीमध्ये याच तत्त्वाचा उपयोग केलेला असतो. अमेरिकेमध्ये तर सूक्ष्मतरंग कंप्रतेच्या विद्युत तरंगांद्वारे तप्त होणाऱ्या, स्वयंपाकघरात वापरण्यास योग्य अशा शेगडया उपलब्ध आहेत.

लेसर शलाकेमध्ये फार मोठ्या प्रमाणात प्रकाश ऊर्जा केंद्रित करता येते. गोल भिंगाच्या साहाय्याने सूर्यप्रकाश ऊर्जा केंद्रित करून कापूस पेटविता येतो असे आर्किमेडीजने फार वर्षांपूर्वी दाखविले होते. लेसरमध्ये जे ऊर्जेचे केंद्रीकरण मिळते, ते भिंगाच्या साहाय्याने उपलब्ध होणाऱ्या ऊर्जा केंद्रीकरणापेक्षा खूपच उच्च प्रतीचे असते, हे मात्र लक्षात घ्यावयास हवे. निरनिराळ्या ५–६ दिशांतून येणाऱ्या लेझर शलाका एकाच वेळी जर प्लाझ्मावर केंद्रित केल्या, तर त्यायोगे प्लाझ्माला मोठ्या प्रमाणात ऊर्जा पुरवठा करता येतो. या प्रयोगात थंड करून गोठ-लेल्या ड्युटेरियम या वायूच्या टाचणीच्या टोकाच्या आकाराएवढ्या गोळ्या यंत्रयोजनेच्या केंद्रस्थानी येतील, अशा बेताने सोडल्या जातात. यावर केंद्रित लेसर किरण पडताच त्यांचा स्फोट होऊन त्यांचे तापमान व दाब यांमध्ये आकस्मिक व प्रचंड अशी वाढ होते. या प्रकारचीच प्रक्रिया हायड्रोजन बाँब-मध्ये घडत असते. यामधील संधारण प्रकाराला निरूढीय संधारण असे म्हणता येते. हायड्रोजन बाँबच्या मध्यभागी हायड्रोजनयुक्त असे घनावस्थी इंधन असते; तर त्या सभोवताली विघटन तत्त्वा-वर कार्य करणाऱ्या आणवीय बाँबचे आवरण असते. आणवीय बाँबचा स्फोट होऊन उच्च तापमान, उच्च दाब इत्यादींची जी निर्मिती होते तीमुळे मध्यभागी ठेवलेल्या इंधन द्रव्यात संघटन क्रिया सुरू होऊन परिणामी त्यामधून आणखी जास्त ऊर्जा बाहेर

टाकली जाते. हायड्रोजन बाँबमध्ये मध्यभागी ठेवलेल्या इंधन द्रव्याऐवजी ड्युटेरियमची ( १ ट्रिटियमची ) गोळी आहे अशी कल्पना केली व आणवीय बाँबस्फोटाऐवजी लेसर शलाकेद्वारा ऊर्जा पुरवठा केला जात आहे हे लक्षात घेतले, तर लेसर शलाकेद्वारा नियंत्रित अणुसंघटन विक्रियेद्वारा ऊर्जा कशी मुक्त केली जाते, याची सुलभपणे कल्पना करणे शक्य होते. याच संदर्भात अंतर्ज्वलन इंजिनाचा दाखला सुद्धा उपयुक्त ठरावा. अशा इंजिनामध्ये इंधनतेल, बाष्प व हवा यांच्या मिश्रणाचा थोडया थोडया कालखंडाने सतत पुरवठा करून त्याचा विद्युत स्फुल्लिंगाद्वारा स्फोट केला जातो. या स्फोटातून जी ऊर्जा बाहेर पडते त्यायोगे इंजिन कार्यान्वित होत असते. याचप्रकारे ड्युटेरियम ( १ ट्रिटियमच्या ) गोळयाचा थोडया थोडया अंतराने पुरवठा करून त्याचा लेसर शलाकेद्वारा स्फोट केल्यास अणुसंघटन क्रियेवर आधारित विक्रियेत ऊर्जा कशी विमुक्त केली जाते, याविषयी कल्पना करता येते.

काही काळापूर्वी अमेरिकेमध्ये प्रिन्स्टन येथील प्रयोगशाळेत वरीलपैकी पहिली रीत वापरून प्लाझ्माचे तापमान ६० दशलक्ष केल्व्हीन अंशांपर्यंत वाढविण्यामध्ये यश मिळाल्याचे प्रकट करण्यात आले होते, ते अनेकांनी वाचले असावे. वरील तापमानमूल्य तर सूर्याच्या अंदाजी तापमानापेक्षाही खूप जास्त आहे. अणुसंघटन विक्रिया स्वयंपोषक होण्याकरिता जो कालखंड आवश्यक असतो, तितका वेळ हे तापमान स्थिर राहू शकले नाही, तरी १/१० सेकंदात कित्येक कोटी हायड्रोजन ( ड्युटेरियम / ट्रिटीयम ) अणूंचे होलियममध्ये रूपांतरण झाले, याबद्दल प्रायोगिक पुरावा मिळाला असे जाहीर करण्यात आले. पण त्यानंतर झालेल्या काही प्रयोगांवरून वरील दोन्ही निष्कर्षांबद्दल शंका व्यक्त करण्यात आल्या आहेत. ते काहीही असले तरी या विषयात झपाटयाने प्रगती होत आहे, याबद्दल मात्र काहीही शंका नाही. निरनिराळया काळी प्रयोगशाळेत प्लाझ्माकरिता जी सर्वोच्च तापमाने मिळविण्यात यश आलेले दिसते त्यावरून हे स्पष्ट होते. १९७० साली सर्वोच्च तापमानमूल्य ५ दशलक्ष केल्व्हिन, १९७७ साली हे २५ दशलक्ष केल्व्हिन अंशांपर्यंत गेले, तर १९७८ साली ६० दशलक्ष अंश केल्व्हिन तापमान संपन्न करण्यात आल्याचा दावा केला गेला आहे. यावरून प्रयोगशाळेत नियंत्रित आणवीय औष्णिक प्रक्रिया ही लवकरच सिद्ध होईल, म्हणजेच मनुष्याला सूर्यामध्ये असणारी उच्च तापमानाची परिस्थिती पृथ्वीवर निर्माण करण्याची क्षमता प्राप्त होईल अशी आशा करावयास काही हरकत नाही असे वाटते. अशा रीतीने निर्माण केलेल्या उच्च तापमानाच्या वायूमध्ये सूर्याप्रमाणेच अणुकेंद्रीय विक्रिया सुरू होऊन ऊर्जा मुक्त केली जाणार असल्यामुळे अशा वायूचा उर्जाउद्गम म्हणून उपयोग करता येईल, हे उघड आहे.

कोळसा इंधन म्हणून जाळून त्यावर पाणी तापवून त्याच्या वाफेवर कार्यान्वित होणाऱ्या बाष्पयंत्राचा शोध मानवाने प्रथम लावला. त्यामुळे जगातील अनेक देशांत औद्योगिक क्रांती संपन्न होऊन तेथील सामान्य जनतेचे राहणीमान सुधारले किंवा त्यामध्ये सुधारणा होण्याचा संभव वाढला. वर वर्णन केलेल्या प्रयोगामुळे पाण्याचा प्रत्यक्ष इंधन म्हणून उपयोग करून त्याच्या अणूत असणाऱ्या ऊर्जेला मुक्त करण्याची नवी रीत दृष्टिक्षेपात आली आहे. या प्रक्रियेकरिता लागणारे ड्युटेरियम सर्वत्र सापडते. कोणत्याही पाण्याच्या नमुन्यात ड्युटेरियमयुक्त जड पाण्याचे प्रमाण $\frac{1}{7000}$ एवढे असते. समुद्राच्या पाण्याचा साठा जवळजवळ अमर्याद आहे त्यामुळे या नव्या इंधनाचा साठा कित्येक शतक वर्षांपर्यंत पुरेसा पडेल असा अंदाज करण्यात आला आहे. या प्रक्रियेकरिता लागणारा इंधनसाठा मुबलक आहे, एवढाच या पद्धतीमधील चांगला भाग नसून तिच्यात इतर अनेक इष्ट व चांगले गुण आहेत. ड्युटेरियम किरणोत्सर्गी नाही. त्यामुळे अशा अणुभट्टीमुळे भोवतालचे परिसर-वातावरण दूषित होण्याचा संभव असत नाही. आणवीय प्रक्रिया होऊन गेल्यानंतरसुद्धा त्यामध्ये नवी किरणोत्सर्गी द्रव्ये निर्माण होत नाहीत. या उलट युरेनियमवर आधारित अशा अणुभट्टीमध्ये प्लुटोनियमसारखी अनेक नवीन किरणोत्सर्गी द्रव्ये तयार होत असतात. या किरणोत्सर्गी द्रव्यांची योग्य व सुरक्षित अशी







विल्हेवाट कशी लावावयाची हा केवढा विकट प्रश्न आहे, हे वर्तमानपत्रांमधील बातम्यांवरून कोणाच्याही लक्षात आल्यावाचून राहत नाही. या सर्व गोष्टींचा विचार करता ड्युटेरियम हे इंधन वापरणारी अणुभट्टी लवकरच कार्यान्वित होऊन मानवाच्या पुढे सध्याच्या काळी, इंधन व ऊर्जापुरवठा यांसारखे जे निकडीचे प्रश्न उभे आहेत, ते सोडविण्यास मोठ्या प्रमाणात मदत होईल अशी चिन्हे पण दिसू लागली आहेत. तसा विचार केला असतदगडी कोळसा, खनिज तेल यांसारखी इंधने आतापर्यंत वापरली जात होती त्यांचे उगमस्थान सूर्यापासून मिळणाऱ्या उर्जेपासूनच होते. सध्या मानव आपल्या प्रयोगशाळेत सूर्यावरील विक्रियेसारखी प्रक्रिया निर्माण करण्याचा प्रयत्न करीत आहे. त्याची ही प्रगती मूलभूत स्वरूपाची आहे, याबद्दल शंका नाही. आतापर्यंतची या संदर्भातील त्याची प्रगती पाहता या प्रकारची अणुभट्टी कार्यान्वित करता येईल की नाही हा प्रश्न राहिला नसून ती तांत्रिक दृष्टचा मूर्त स्वरूप केव्हा धारण करते एवढाच प्रश्न उरला आहे, असे वाटू लागले आहे.



# म. फुले यांचे लोकशाहीविषयक विचार

अशोक चौसाळकर

म. जोतीराव फुले यांनी लोकशाही आणि राष्ट्रवाद या विषयांवर काही वैशिष्ट्यपूर्ण विचार मांडलेले आहेत. या विषयांवर त्यांनी मूलगामी असे चिंतन केले होते. प्रस्तुत लेखात त्यांच्या लोकशाही-विषयक विचारांचे परीक्षण करण्यात आले आहे.

## बळीचे राज्य

जोतीराव लोकशाहीचे खंदे पुरस्कर्ते होते. त्यांना पाश्चिमात्य लोकशाहीतील समता, बंधुता व स्वातंत्र्य या प्रेरणा नेहमी आकर्षित करीत असत. आपल्या देशाच्या अनार्य परंपरेतदेखील अशा लोकशाही परंपरा आहेत असे त्यांना वाटत असे. म्हणूनच या देशात इराणी आर्य येण्यापूर्वी जे 'बळीचे राज्य' होते ते लोकशाही राज्य होते असा त्यांचा दावा आहे. लोकांना, विशेषतः शेतकऱ्यांना प्रिय असणारे बळीराजाचे राज्य वामनाने कपटाने त्यापासून हिरावून घेतले व संपूर्ण समाजावर ब्राह्मणांची गुलामगिरी लादली असे त्यांचे मत आहे.[१] गुलामगिरीत ब्राह्मणी संस्कृतीस पर्यायी अशी एक शक्तिशाली सांस्कृतिक परंपरा उभी करण्याचा जोतीरावांचा प्रयत्न आहे.[२]

"बळीचे राज्य" हे लोकशाही राज्य होते. किंबहुना आर्य येण्यापूर्वी प्राचीन काळी सर्व देशभर लोकसत्तात्मक राज्ये होती असा क्रांतिकारक विचार जोतीरावांनी त्यांच्या 'शेतकऱ्याच्या असूड' मध्ये मांडला आहे. जोतीराव सांगतात, की निसर्गाच्या मदतीने, हळूहळू माणूस स्थिर झाला. उपजीविकेची साधने शोधीत असतानाच त्याने कुटुंबसंस्था स्थापन केली. हळूहळू त्यातील काही कुटुंबे एकत्र आली आणि त्यांनी गावे वसविली. लोकांनी गावाचे चोरांपासून व हिंस्र जनावरांपासून रक्षण करण्यासाठी वेसकराची नेमणूक केली. शेती करण्याची कला लोकांना अवगत झाली व खानेसुमारी वाढू लागली. त्यामुळे गावांच्या व लोकांच्या संख्येत वाढ झाली. परिणामी लोकांत पैशासाठी व जमिनीसाठी तंटे होऊ लागले. सर्वानुमते एक शहाणा व माहितगार माणूस भांडणे व कज्जे सोडवीत असे. पण हळूहळू राज्याचे कार्य वाढत गेले. दंगेधोपे जास्त प्रमाणात होऊ लागले. त्यामुळे हुशार प्रतिनिधींची निवड करून लोकांनी सर्वानुमते प्रशासनयंत्रणा स्थापन केली आणि त्या लोकसत्ताक राजवटीत लोक काही काळ आनंदाने राहिले. पण हळूहळू ही यंत्रणा लयास गेली व ९६ कुळीचे प्रतिनिधी स्वतःच राजे बनून राहिले. पण त्यांचा इराणातून आलेल्या आर्यांनी पराभव केला. आर्यांचा नृसिंह, परशुराम, वामन वगैरे योद्ध्यांनी येथील मूळ लोकांचा पराभव करून त्यांना आपले दास, शूद्र, अतिशूद्र बनवून त्यांच्यावर आपली गुलामगिरी लादली.[३]

बळीचे मूळचे लोकसत्ताक राज्य नष्ट झाले व त्या जागी आर्यांचे राज्य आले. जोतीरावांच्या वरील विवेचनास वास्तविक इतिहासात फारसा आधार नसेल; पण त्यांनी त्यांचे विवेचन महाराष्ट्रातील समाजजीवनातील जुनाट चालीरीती, गावांची वसाहत व कुळपरंपरा यांचा आधार घेऊनच केले आहे. जोतीरावांच्या विवेचनात देखील मूळ समाज हा शासनविहीन होता, नंतर तो लोकसत्ताक झाला आणि त्यानंतर राजसत्ताक झाला हा विकासक्रम येतो. त्यांचे असे मत आहे, की आर्यांनी येथील मूळ रहिवाशांचा पराभव केला आणि जातिभेदाचे व वर्णभेदाचे भूत उभे केले. त्यासाठी श्रमविभागणीवर आधारलेली वर्णव्यवस्था स्थापन केली.[५] शूद्रांना





धर्मविषयक भूलथापा मारून त्यास स्वतःचे कायिक, वाचिक व मानसिक गुलाम केले.

भारतात जरी बळीची परंपरा गाडली गेली असली तरी युरोपात ती शक्तिशाली होती असे जोतीरावांचे मत होते. तिचा उदय प्रथम ग्रीस देशात झाला. ग्रीक लोक लोकशाहीचे व प्रजासत्ताकाचे पुरस्कर्ते होते म्हणूनच स्पार्टाने थर्मापिलीच्या खिंडीत इराणच्या झर्झिसच्या प्रचंड सैन्याचा पराभव केला.[६] त्यांचा कित्ता पुढे इटालीतील रोमन लोकांनी गिरवला व सर्व जगाला प्रजासत्ताकाचे धडे दिले. पण याच रोममध्ये ज्युलियस सीझरसारखा प्रजासत्ताकास नष्ट करण्याची इच्छा धरणारा सरदार झाला. पण त्याचा मित्र ब्रूटस याने त्याचा लोकशाहीच्या रक्षणार्थ खून केला.[७] त्यानंतर दीनांचा कैवारी अशा बळीराजाचे– येशू ख्रिस्ताचे–आगमन झाले. त्याने सत्यमय ज्ञानाचा प्रसार केला.[८] पण त्याच ज्ञानाच्या जोरावर पुढे इंग्रजांनी आपल्या प्रजासत्ताक राज्यात राजेशाही, वंशपरंपरागत बडे लोक यांची मिसळ करून एक गोड कडबोळे तयार आणि सर्वांचीच समजूत काढली.[९] बळीच्या विचारांचा पुढचा टप्पा म्हणजे फ्रेंच व अमेरिकन राज्यक्रांती. अमेरिकन राज्यक्रांती शेतकऱ्यांचे पुढारी जॉर्ज वॉशिंग्टन यांनी घडवून आणली म्हणून ते त्यास परम आदराने महाप्रतापी 'वाशिंग्टन तात' असे संबोधितात[१०] त्याचप्रमाणे जोतीराव फ्रेंच राज्यक्रांतीतील एक पुढारी लफेहे याची पण एक उत्तम देशाभिमानी म्हणून स्तुती करतात.[११]

थोडक्यात सांगायचे झाले तर जोतीरावांच्या मते हे सर्वच पुढारी बळीचे खरेखुरे अनुयायी होते, ज्यांनी लोकांच्या जीवनात क्रांती घडवून आणली आणि त्यांना स्वातंत्र्य, समता व बंधुभाव यांचे महत्त्व पटवून दिले. पण भारतात मात्र ही परंपरा दडपली गेली.

## जोतीरावांची लोकशाहीची संकल्पना

जोतीराव लोकशाहीस 'बळीचे राज्य'– कष्टकरी जनतेचे राज्य असे संबोधित असत. त्यांची लोकशाहीची संकल्पना युरोपातील उदारमतवादी विचारांच्या चौकटीत व्यक्त झाली आहे. ते पुनः पुनः सांगतात, की इंग्रजांच्या स्वतंत्र राजवटीमुळेच त्यांना ब्राह्मणांच्या जुलमाविरुद्ध विचार व्यक्त करता आले.[१२]

म. फुल्यांच्या विचारव्यूहात सर्वांत महत्त्वाचे स्थान मानवी हक्क या कल्पनेला आहे. कारण सर्व मानवास निसर्गतःच समान हक्क प्राप्त झालेले आहेत. ते म्हणतात, "आपणा सर्वांच्या निर्मिकाने एकंदर सर्व प्राणिमात्रांस उत्पन्न करतेवेळी मनुष्यास जन्मतः स्वतंत्र प्राणी निर्माण केला आहे आणि त्यास आपापसांत सारखे हक्काचा उपभोग घेण्यास समर्थ केला आहे आणि याच कारणास्तव प्रत्येक मनुष्य गावातील व मुलखातील अधिकारांच्या जागा चालविण्याचा अधिकारी आहे."[१३] स्त्री-पुरुषांना त्यांचे हक्क कळवून त्याप्रमाणे वागणे म्हणजे सत्याने वागणे असे त्यांचे मत होते.[१४] म्हणूनच त्यांच्या ३३ सत्यवर्तनाच्या नियमांत 'निसर्गतःच स्त्रीपुरुष एकंदर सर्व अधिकारांचा उपभोग घेणेस पात्र आहेत' अशा अर्थाचा पहिला नियम केला आहे.[१५] हे सत्यवर्तनाचे ३३ नियम म्हणजे जोतीरावांच्या स्वातंत्र्यवादी विचारांचा जाहीरनामाच आहे. त्यात त्यांनी धार्मिक, राजकीय व सामाजिक स्वातंत्र्य मान्य केले आहे. सर्व मानव स्त्रीपुरुषास निर्मिकाने मानवी हक्काचे, धर्मविषयक व राजकारणविषयक हक्काचे धनी केले आहे असे ते बजावतात.[१६]

जोतीराव स्वातंत्र्याचे भोक्ते होते. त्यामुळेच त्यांनी आपले 'गुलामगिरी' हे पुस्तक अमेरिकन निग्रोंच्या मुक्तीसाठी लढणाऱ्या सद्वर्तनी अमेरिकनांना अर्पण केले आहे. कारण मानवाच्या प्रगतीसाठी स्वातंत्र्य आवश्यक आहे. ते लिहितात, "मनुष्याला स्वतंत्रता असणे ही एक मोठी जरुरीची गोष्ट आहे. जेव्हा मनुष्य स्वतंत्र असतो तेव्हा त्यास आपले मनात उद्भवलेले विचार स्पष्ट रीतीने इतर लोकांस बोलून अथवा लिहून दाखविता येतात. तेच विचार त्यास स्वतंत्रता नसल्यामुळे मोठे महत्त्वाचे असूनही लोकांचे हितावह का असेनात, तथापि ते त्यास दुसरे कोणास कळविता येत नाहीत. आणि तसे झाले म्हणजे काही काळाने ते विचार लयास जातात. त्याचप्रमाणे मनुष्य स्वतंत्र असल्यापासून तो आपले सर्व मनुष्यमात्रास जे सर्वसाधारण हक्क, सर्व जगाचा जो नियंता व सर्वसाक्षी परमेश्वर याने दिलेले असून केवळ

अनुक्रमणिका

स्वहिताकडे ज्यांचे लक्ष आहे असे कृत्रिमी लोकांनी लपवून ठेविले तर त्यापासून मागून घेण्यास मागे सरत नाहीत व त्यांचे हक्क मिळाले असता त्यांना परमसुख होते."[१७] थोर लोक परहितार्थ आपले प्राण पणास लावून इतरांच्या स्वातंत्र्यासाठी लढतात कारण स्वातंत्र्य हे हे मूल्यच तसे थोर आहे.

जोतीरावांची लोकशाहीची संकल्पना मानवी हक्क व मानवी स्वातंत्र्य यांभोवती विकसित झालेली आहे. त्यांनी आपल्या सत्यवर्तनाच्या ३३ नियमांत समता, बंधुता, स्वातंत्र्य, सर्वधर्मसमभाव, करुणा, न्याय वगैरे तत्त्वांचा पुरस्कार केला आहे.[१८] प्रत्येकाने आपल्या हक्कांसाठी संघर्ष छेडला पाहिजे व ते मिळविले पाहिजेत असे ते सांगतात.

त्यांची लोकशाहीची कल्पना भांडवलशाहीतील केवळ स्पर्धेतील समान संधीवर आधारलेली नाही; कारण विषम स्पर्धकांत झालेली स्पर्धा न्याय्य नसते असे त्यांचे मत होते.[१९] त्यासाठी देशातील बहुजन-समाजाला विद्या दिली पाहिजे. त्यांच्या जीवनातील जी गती नष्ट झालेली आहे ती त्यांना मिळवून दिली पाहिजे. त्यासाठी गरीब व दलितांच्या शिक्षणासाठी विशेष प्रयत्न केले पाहिजेत.[२०] हे विचार मांडीत असताना खऱ्या लोकशाहीसाठी हे आवश्यकच आहे असे त्यांना वाटत असावे.

त्यांच्या लोकशाहीच्या कल्पनेचे दुसरे महत्त्वाचे अंग म्हणजे त्यांची आदर्श राज्याची कल्पना. जोतीरावांनी लोकशाहीच्या इतर व्यावहारिक बाबींचा फारसा विचार केलेला नाही; पण त्यांना अभिप्रेत असलेल्या अमूर्त मूल्यांच्या आधारे 'निर्मिकाच्या राज्या'ची रूपरेषा रेखाटली आहे. त्यांचे 'निर्मिका'चे राज्य बंधुत्वाच्या कल्पनेवर आधारलेले आहे म्हणूनच ते विश्वकुटुंबात्मक आहे. ते सांगतात की, या राज्यात धर्माची बनवाबनवी नसेल, लोक वस्तूंचा श्रमाप्रमाणे मोबदला घेतील व ते परस्परांत बंधुभावाने राहतील.[२१] निर्मिकाचे राज्य हे स्वतः कष्ट करून खाणाऱ्या, नीतीने वागणाऱ्या लोकांचे राज्य असेल. जात, प्रांत, देश, खंड व धर्म यांचा अडसर न मानता सर्व स्त्रीपुरुष जर आनंदाने सत्यवर्तन करून राहू लागले तर ते निर्मिकाचे राज्य होय. असे जर एकंदर सर्व स्त्रीपुरुषांचे वर्तन असते तर "एकंदर सर्व जगातील देवबापा परशुरामादि शिपायांस, पोलिसांस, न्यायाधिशांस व तुरुंगातील शिपायांस अजिबात फाटा द्यावा लागला असता."[२२] लोक जर सत्याचे आचरण करतील तर असे दंडविहीन, शासनविहीन आदर्श राज्य वास्तवात येऊ शकेल असे जोतीरावांना वाटत असावे. कारण अंतिमतः त्यांचे निर्मिकाचे राज्य हे विश्वकुटुंबात्मक, सर्वधर्मसमभाव पाळणारे, परस्परांच्या हक्कांची जाणीव ठेवून सत्यवर्तन करणाऱ्या लोकांचे दंडहीन राज्य आहे.

जोतीरावांची आदर्श राज्याची कल्पना अराजकतवादी आहे; पण आपल्या विचारांची त्यांनी व्यवस्थित अशी मांडणी केलेली नाही. त्यांनी 'बळीचे राज्य' आणि 'निर्मिकाचे राज्य' या दोन संकल्पनांतील फरक स्पष्ट केलेला नाही. त्यांनी लोकशाहीतल्या काही अमूर्त अशा मूल्यांच्या आधारे आदर्श राज्याचे एक कल्पनारम्य चित्र रेखाटले आहे.

थोडक्यात सांगायचे झाले तर जोतीरावांची लोकशाहीची कल्पना उदारमतवादी लोकशाही विचारांच्या चौकटीतच विकसित झालेली आहे आणि त्यांचे 'निर्मिकाच्या राज्या' विषयीचे विचार पण त्याचाच परिणाम आहे.

जोतीरावांच्या विचारात एक विरोधाभास आपणास जाणवतो. ते इंडियन नॅशनल काँग्रेस आणि रिपनच्या स्थानिक स्वराज्य कायद्यास विरोध करतात. पण प्रत्यक्षात काँग्रेस पक्ष लोकशाही राजवटीची मागणी करीत होता आणि स्थानिक स्वराज्य कायदा त्या दृष्टीने एक पुढचे पाऊल होते. पण जोतीरावांनी दोन्हींवरही टीका केली आहे.

## जोतीरावांची काँग्रेसवर टीका

जोतीरावांना भारतात शेतकऱ्यांचे राज्य स्थापन व्हावे असे वाटत होते; पण तसे राज्य 'इंडियन नॅशनल काँग्रेस' आणू शकणार नाही कारण जास्तीत जास्त जोखमीच्या जागा मागून ब्राह्मणांची गुलामगिरी लादण्याचा तो एक ब्राह्मणी कावा आहे असे त्यांचे मत होते. त्यामुळे ते 'न्याशनल सभे'स 'नारदाचा सुभा' म्हणून संबोधतात.[२३] ती आर्यहितासाठी स्थापन झालेली आहे, त्यात शूद्रास शोभा नाही.[२४] म्हणून अंत्यजांनी इंग्लिशास 'पोटी गच्च' धरून काँग्रेसला विरोध करावा व ब्रह्मकपट

अनुक्रमणिका

ह्मणून पाडावे.[२५] कारण ह्या देशाचे नाव सांगून आपल्या जातीसाठी पार्लमेंट व सिविल सर्विस मिळविण्याचा डाव आहे.[२६] ब्राह्मण पुढाऱ्यांच्या वागण्यात लोकशाहीची तत्त्वे नाहीत पण ब्रॅडला सारखे लोक त्यांच्या वाचाळपणास भुलत आहेत म्हणून जोतीराव बजावतात–

" इंग्रजांनो तुम्ही बसू नका उगे ।
ब्राडलास वेगे । आणा येथे ।।
त्याचे काना धरा दावा दुष्ट वेद ।
आर्याजीचा मद । शूद्रकाल ।।
त्याला ठावे नाही शूद्रादिक हाल ।
कृत्रिमाचा लाल । चमकेना ।।
अनुभवाविन व्यर्थ वाचाळता ।
जळो ती विद्वता । जोती म्हणे ।।[२७]

म. फुल्यांना तत्कालीन ब्राह्मण पुढाऱ्यांच्या वागण्यातील व बोलण्यातील फरक माहीत होता म्हणून त्यांनी त्यांची एकीची कल्पना धुडकावून लावली. कारण काँग्रेस शूद्रातिशूद्र व इंग्रज यांच्यामध्ये उगीचच वैर पसरवत आहे. शूद्रातिशूद्रांची ब्राह्मणांच्या गुलामगिरीतून इंग्रजांनीच सुटका केली. ब्राह्मण सत्यप्रीती शिकलेले नाहीत. त्यांच्या वागण्यात त्यांचा जुनाच मद आहे. अशा लोकांशी एकी होणार नाही असे जोतीबा सांगतात–

" सावली न घेता महारामांगाची ।
प्रीत बंधुत्वाची । जोड कैसी ।।
न्याशनल सभा इंग्रजा का बोधी ।
सत्य वर्ता आधी । जोती म्हणे ।। "[२९]

ज्यांना सत्यप्रीती व बंधुप्रीती नाही त्यांच्या एकीच्या कल्पनेची टवाळी करून ते कडाडतात–

" जाळ तुझी फुकी एकी ।
धूर्त नटी । अर्धमुकी ।।
तुम्ही आर्य कार्यसाधु ।
नव्हत शूद्राचे हो बंधु ।। "[२८]

ब्राह्मणांच्या एकीच्या कल्पनेस त्यांनी कडाडून विरोध केला आणि जोपर्यंत ब्राह्मण मानवी हक्क व मानवामानवांतील समानता व्यवहारात मानीत नाहीत, तोपर्यंत त्यांच्या लोकशाही व राष्ट्रवादाच्या गप्पा फुक्या आहेत. कारण तेच मूलतः शूद्रातिशूद्रांच्या दुरवस्थेला जबाबदार आहेत.[३०]

जोतीरावांचे काँग्रेसला विरोध असण्याचे खरे कारण त्यातील ब्राह्मणांचे प्रभुत्व हे होते. काँग्रेस ही नावाला 'नॅशनल' आहे आणि सार्वजनिक सभा ही नावाला 'सार्वजनिक' आहे; प्रत्यक्षात त्यांचे सर्व सभासद ब्राह्मण आहेत आणि त्यांचा देशातील अठरापगड जातींशी काहीही संबंध नाही; म्हणून त्या मोठ्या व फसव्या नावांत काहीच अर्थ नाही असे जोतीराव सांगतात.[३१] त्यामुळे या पुढाऱ्यांनी शेपन्नास अर्धे कच्चे शूद्र लोक घेऊन तात्पुरती एकी करण्याचा प्रयत्न केला तरी तो क्षणिकच ठरणार आहे.[३२] कारण मूलतः राष्ट्र ही कल्पना ब्राह्मण पुढारी सांगतात त्यापेक्षा वेगळी आहे. भारतातील जातिभेदामुळे ब्राह्मणांनी प्रसृत केलेल्या रोटीबंदी, बेटीबंदी यांसारख्या रूढींमुळे आपल्या समाजात लोकांचे वेगवेगळे तुकडे पडले. प्रत्येकाचे आचार व विचार भिन्न झाले. त्यामुळे समाजात मेळ आणि एकोपा राहिला नाही. राष्ट्र किंवा Nation म्हणजे 'एकमय लोक'. पण अशा दुभंगलेल्या समाजात अठरापगड जातींच्या अठरा धान्यांचे चरचरीत कडबोळे बनणार नाही; कारण राष्ट्र बनण्यासाठी परस्परांबद्दल प्रेम पाहिजे असे त्यांचे मत होते.[३३] म्हणून "या बळीस्थानातील एकंदर शूद्रादि अतिशूद्रासह भिल्ल, कोळी वगैरे सर्व लोक विद्वान् होऊन विचार करणे लायक होईपर्यंत ते सर्वसारखे 'एकमय लोक' Nation होऊ शकत नाहीत."[३४]

लोकशाही राष्ट्र वगैरे मूल्ये अंतिमतः जोतीरावांना मान्य असली तरी त्यांचा स्थलकालसापेक्ष विचार झाला पाहिजे असे त्यांचे मत होते. म्हणून फक्त ब्राह्मणच जर राजकीय हक्कांचे वाटेकरी बनून इतरांवर आपले वर्चस्व लादणार असतील तर त्यास विरोध केला पाहिजे. त्यासाठी तावडतोबीच्या राजकारणात इंग्रज त्यांना मित्र वाटत होते. इंग्रजांच्या राज्यामध्येच शूद्रातिशूद्रांनी जलदी व घाई करून विद्या मिळवावी आणि जोखमीच्या जागा स्वीकारण्यास तयार व्हावे. कारण इंग्रज हे आपल्याला सदासर्वदा पुरावयाचे नाहीत, असे त्यांचे मत होते.[३५] जोपर्यंत शूद्रादी अतिशूद्र लोकशाहीचा व राष्ट्रवादाचा फायदा घेऊ शकत नाहीत, तोपर्यंत त्यांच्या नावावर काही लोक आपला फायदा करून घेतील व मूळ मूल्यांनाच धोका निर्माण होईल असे जोतीरावांना वाटत असे. त्यामुळेच त्यांनी लॉर्ड रिपन यांच्या स्थानिक स्वराज्य कायद्यास विरोध

केला आहे. कारण रिपनने भारताची सामाजिक परिस्थिती न जाणता तो कायदा लागू केला आहे. त्या कायद्यामुळे ब्राह्मण सांगतील तो धर्म व इंग्रज सांगतील तो कायदा मानणाऱ्या अज्ञानी शूद्रादी अतिशूद्रांना मतदानाचा अधिकार जरी मिळाला असला तरी त्याचा ब्राह्मण गैरफायदा घेतील अशी त्यांची तक्रार होती.[१६] ब्राह्मणांचे प्रभुत्व असलेल्या म्युन्सिपालिटचा ब्राह्मणांचे हितसंरक्षण करण्यासाठी राबविल्या जातात असे त्यांचे अनुभवान्ती मत बनले होते.[१७] या देशातील सामाजिक परिस्थितीचा पोक्त विचार केल्याशिवाय हा कायदा केल्याबद्दल त्यांनी रिपनला 'पावणेदोन शहाणा' असे म्हटले आहे.[१८] जोतीरावांच्या विचारातील ह्या विरोधाभासाच्या कारणाचा आम्ही इतरत्र सविस्तर ऊहापोह केला आहे.[१९] अशा प्रकारच्या द्वंद्वाचे मुख्य कारण त्या काळातील भारताची विचित्र सामाजिक आर्थिक स्थिती होती. ज्यावेळी समाजातील प्रत्येक नवजागृत जाति आपल्या प्रश्नाभोवती लढ्याचे कार्यक्रम राखीत असे कारण त्या जातीस इतर जातींतील लोकांशी स्पर्धा करावयाची होती. ब्राह्मणासारख्या सुधारलेल्या जातीशी स्पर्धा इंग्रजांच्या मदतीनेच करता येत होती, म्हणूनच इंग्रजांशी मैत्री करण्याची कल्पना पुढे आली. ज्यामुळे ब्राह्मणांच्या शक्तीमध्ये वाढ होईल, आधीच विषम असलेली स्पर्धा जास्तच विषम होईल म्हणून ब्राह्मणांना तावडतोबीने व वरचष्मा मिळवून देणाऱ्या राजकीय सुधारणांना विरोध करण्यात आला. यात सरळ सरळ राजकारण होते.

## जोतीरावांच्या लोकशाहीविषयक विचारांचे विश्लेषण

जोतीरावांचे विचार उदारमतवादी विचारसरणीवर पोसलेले होते म्हणूनच ते मानवी हक्क आणि स्वातंत्र्य यांच्या संदर्भात त्यांनी ते व्यक्त केले. त्यांच्या काळातील भारतातील इतर बरेच विचारवंत त्यांच्यासारखेच उदारमतवादी विचारसरणीचे पाठीराखे होते. पण त्यांच्या व जोतीरावांच्या विचारांतील फरक स्पष्ट दिसून येतो; कारण जोतीरावांना अभिप्रेत असलेले आदर्श राज्य शेतकऱ्यांचे वा कष्टकऱ्यांचे राज्य होते. त्यात ऐतखाऊ लोकांना फारसे स्थान नव्हते. इतरांना पाश्चिमात्य पद्धतीचे भांडवलशाही स्पर्धेवर आधारलेले लोकशाही राज्य स्थापन करावयाचे होते. म. फुल्यांचे हे विचार मध्यमवर्गीय उदारमतवाद्यांपेक्षा वेगळे होते. त्यांच्या आदर्श राज्यात श्रम करणाऱ्या शेतकऱ्याला —बळीराजाला— महत्त्वाचे स्थान मिळालेले होते. दुसरी गोष्ट म्हणजे जोतीरावांनी भारतातील जनसामान्यांच्या लोकशाही परंपरांच्या संदर्भात भविष्यातील लोकशाहीचे चित्र रेखाटले आहे. इतरांना भारतातील प्राचीन लोकशाही परंपरांचे व 'बळीच्या राज्या'चे फारसे सोयरसुतक नव्हते; पण जोतीराव लोकशाही राज्य ही ही कल्पना 'बळीचे राज्य' या शब्दांतून व्यक्त करतात. त्यांच्या लोकशाहीच्या विचारांत प्राचीन ग्रीक रोमन पेन लफेटे वॉशिंग्टन यांच्याबरोबरच येशू ख्रिस्ताच्या विचारांचाही समावेश होतो. कारण त्याने जगाला सत्यमय ज्ञान दिले असे ते मानतात. त्यांच्या 'निर्मिकाच्या राज्या'त दंडसत्तेला स्थान नाही. ती मूलतःच अराजकतावादी आहे. शासनयंत्रणा निर्माण होण्यापूर्वी लोक असेच एकोप्याने राहात होते असे जोतीराव सांगतात. समाजविकासाच्या पशुपालन अवस्थेत लोकतंत्रात्मक राज्ये होती हा मोलाचा विचार जोतीरावांनी १०० वर्षांपूर्वी मांडलेला पाहून आश्चर्य वाटते. पण युरोपातील इतर विचारवंतांशी त्यांच्या विचारांची तुलना करण्याचा मोह आपण टाळला पाहिजे; कारण मार्क्ससारख्यांनी मांडलेली 'राज्यविहीन समाजा'ची कल्पना फार पद्धतशीरपणे आणि शास्त्रीय पद्धतीने मांडलेली आहे. जोतीरावांचा मात्र तो एक कल्पनाविलास आहे; कारण ते भारतासारख्या मागासलेल्या देशात जन्मास आले होते. त्यांच्या काळात—किंबहुना आताही— अशा प्रकारच्या मूलभूत प्रश्नांची चर्चा करावयास आवश्यक असणारे मानव्य व सामाजिक शास्त्रांतील प्रगत ज्ञान मराठीत व महाराष्ट्रात उपलब्ध नव्हते. सामाजिक व आर्थिक विकासही फार थोडा झालेला होता. म्हणून जोतीरावांच्या विचारांत कारखानदारी व भांडवलशाही या संबधात फारसे उल्लेख आढळत नाहीत.

काँग्रेसची स्थापना १८८५ साली झाली आणि जोतीराव नोव्हेंबर १८९० मध्ये मरण पावले. या काळात काँग्रेस पूर्णतः मवाळांच्या ताब्यात होती. काँग्रेसचे पुढारी इंग्रजी राज्यास 'ईश्वराची देणगी'

मानीत होते. ब्रिटिशांच्या मदतीने भारतीयांनी आपला विकास करून घ्यावा, राजकीय सुधारणांपेक्षा सामाजिक सुधारणा जास्त महत्त्वाच्या आहेत असे विचार ते मांडीत असत. तात्त्विकदृष्टया त्यांच्या विचारांत आणि जोतीरावांच्या विचारांत फारसा फरक नव्हता. कॉंग्रेस अजून वैदिक संस्कृतीचा अभिमान बाळगणाऱ्या जहालांच्या ताब्यात गेलेली नव्हती; पण तरीही जोतीरावांनी अतिशय कठोर शब्दांत त्या पक्षाची निंदा केली. कारण तत्कालीन कॉंग्रेस पुढाऱ्याचे आचार व विचार यांच्यातील विसंगती त्यांनी अनुभवली होती. जोपर्यंत समाजातील अठरापगड जाती व जमाती राजकीय दृष्टया जागृत होत नाहीत तोपर्यंत कॉंग्रेस ब्राह्मणांचे हितसंवर्धन करील असे त्यांना वाटत होते. त्यांनी केलेल्या राष्ट्र (Nation) या कल्पनेच्या व्याख्येत हाच विचार पुढे मांडला आहे. म्हणून राजकीय सत्तेमध्ये समाजातील सर्व जातिजमातींना सहभाग मिळाला पाहिजे, कारण तो त्यांचा नैर्सगिक अधिकार आहे. हा विचार जोतीरावांच्या लोकशाहीविषयक विचारांचे मध्यवर्ती सूत्र होते असे म्हणावयास हरकत नाही.

**संदर्भ—**

१) धनंजय कीर व स. गं. मालशे (संपादित) **महात्मा फुले समग्र वाङ्मय** (दुसरी आवृत्ती), महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ, मुंबई, १९८०, पृ. १०४–११०.

२) फुल्यांनी संपूर्ण वैदिक परंपरा नाकारली आहे आणि त्यास समांतर अशी एतद्देशीय लोकांची सांस्कृतिक परंपरा पुरस्कारिली आहे. यात सर्व ब्राह्मणी ग्रंथांचा आणि आणि ज्ञानेश्वरांसारख्या संतांच्या विचारांचा त्यांनी धिक्कार केला आहे त्यासाठी म्हसोबा, खंडोबा, मार्तंड वगैरे देवांच्या नावांची त्यांनी व्युत्पत्तिशास्त्राच्या आधारे मीमांसा केली आहे.

३) म. फुले समग्र वाङ्मय पृ. १०४–११७.
४) उक्त, पृ. १०५–१०७.
५) ,, पृ. ९१.
६) ,, पृ. २२६.
७) ,, पृ. २२६–२७.
८) ,, पृ. १२१–२२.
९) ,, पृ. २२६–२७.
१०) ,, पृ. १३५ व २०३.
११) ,, पृ. १३५.
१२) ,, पृ. २६४.
१३) ,, पृ. ४०३.
१४) ,, पृ. ४७१.
१५) ,, पृ. ४११.
१६) ,, पृ. ४११–१४.
१७) ,, पृ. ८५.
१८) ,, पृ. ४११–१४.
१९) उक्त, पृ. १८०.
२०) ,, पृ. १६८–१८१.
२१) ,, पृ. ३५६.
२२) ,, पृ. ४१६–१७.
२३) ,, पृ. ४९१.
२४) ,, पृ. ४६६.
२५) ,, पृ. ४६६.
२६) ,, पृ. ४८४
२७) ,, पृ. ४७६.
२८) ,, पृ. ४९६–९७.
२९) ,, पृ. ४७९.
३०) ,, पृ. २५३-५९. 'शेतकऱ्यांच्या असूड' मध्ये जोतीरावांनी सध्या ब्राह्मणांशी एकी का होणार नाही याचे सविस्तर विवेचन केलेले आहे.
३१) उक्त, पृ. ४०६.
३२) ,, पृ. २५९.
३३) ,, पृ. ४०७ जोतीरावांनी Nation साठी 'एकमय लोक' हा सुंदर शब्द वापरला आहे.
३४) उक्त, पृ. ४०९.
३५) ,, पृ. १३५-३६.
३६) ,, पृ. २०३.
३७) ,, पृ. १३५ ३६.
३८) ,, पृ. ४३०.
३९) डॉ. व्ही. बी. औटी–अशोक चौसाळकर– "म. जोतीराव फुले यांच्या विचारांचे राजकीय स्वरूप" : तिसरी महाराष्ट्र राज्यशास्त्र परिषद, ३०–३१ जानेवारी १९८२; शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर यात वाचलेला निबंध.

# ग्रंथ-परीक्षण

**'झाड' : शैला बेल्ले; कॉंटिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९८१; पृ. २३५; मूल्य १६ रु.**

'झाड' ही सौ. शैला बेल्ले यांची पहिलीच कादंबरी. प्रसिद्ध कादंबरीकार श्री. श्री. ना. पेंडसे यांनी या कादंबरीला प्रस्तावना लिहिलेली आहे. ते म्हणतात त्याप्रमाणे लेखिकेच्या पुढील कादंबरीलेखनाविषयी अपेक्षा वाढविणारी ही कादंबरी आहे.

कर्नाटकाच्या संपन्न निसर्गाच्या पार्श्वभूमीवर ही कादंबरी साकार होते. अस्पृश्य असलेला पुरंदर आणि ब्राह्मणकन्या सुमंगली यांच्या प्रेमाची ही कथा. या कथेत जे नाट्य निर्माण होते ते केवळ ती दोघे वेगळ्या जातींतील आहेत म्हणून नव्हे; तर त्यांची स्वभाववैशिष्टये एकमेकांना पूरक असण्याऐवजी ती एकमेकांना छेद देणारी आहेत म्हणून.

या कादंबरीतील पात्रांचे जीवन तसे सीमित आहे, संकुचित आहे. ती अल्पसंतुष्ट आहेत. परंपरेच्या जोखडाशी ती बांधलेली आहेत. 'झाड' हे या परंपरेतीलच एक प्रतीक. ही पात्रे सुब्रह्मण्या या देवाला प्रमाणित मानतात आणि पूर्वीपासून आलेली परंपरेची पालखी पुढे नेतात. ही पात्रे श्रद्धा-अंधश्रद्धा यांतही फरक करीत नाहीत.

जरी ही पात्रे सुब्रह्मण्याला मानीत असली तरी त्यांच्या स्वतःच्या इच्छा, वासना यांचाच प्रभाव त्यांच्या जीवनावर आहे. पुरंदर आणि सुमंगली ही एका वेगळ्या नात्याने विश्वंभरशास्त्रींशी संबद्ध आहेत. विश्वंभरशास्त्री हे विद्वान ब्राह्मण; पण ते व वज्री यांच्या संबंधातून पुरंदर जन्माला येतो. तर विश्वंभरशास्त्रीशी लग्न झाले नाही याचे दुःख मनी वागवत सुमंगलीची आई रत्नाम्मा यज्ञेश्वरशास्त्रीबरोबर संसार करीत असते. या जगरहाटीपेक्षा वेगळ्या आशा-आकांक्षांनी जगणाऱ्या वडिलधाऱ्यांच्या जीवनाची सावली पुरंदर व सुमंगली यांच्या जीवनावर पडलेली आहे.

यांच्या सभोवतालचे जीवन देखील असे कोंदटलेलेच आहे सुब्रह्मण्याच्या देवळात वावरणारी, त्याला मानणारी पात्रे छिद्रान्वेषी आहेत. आपला अहंगंड पोसता पोसता पुरंदरपुढे ती दयनीय ठरतात. अहंगंड, लाचारी, व्यवहार संभाळण्याची पद्धती, क्षुद्रत्व यांतून जीवनाचे एक मजेशीर चित्र उभे राहाते. वाचकांसमोर हे चित्र लेखिकेने यथार्थपणे उभे केलेले आहे.

साऱ्या कादंबरीचा रोख आहे तो सुमंगलीच्या भावविश्वावर. ते भावविश्व उमलते कसे, त्याला धक्के कसे बसतात, त्यातून ती मार्ग कसा काढते याचे चित्रण करताना लेखिका यशस्वीही झालेली आहे. विशेषतः आपण पुरंदरची रखेली आहोत ही तिला झालेली जाणीव ही तिच्या सखोल चिंतनाची साक्ष देते. पण कधी लेखिका अयशस्वीही ठरते. ती तिच्या लेखनाची मर्यादाही ठरते. उदा. लहानपणापासून डॉर्मेटरीत जाणाऱ्या सुमंगलीचा धर्मांतराचा विचार एकदम येतो. तिचे हे परिवर्तन स्वाभाविक वाटत नाही.

असे असले तरी प्रत्ययकारी निसर्गवर्णन, ओघवती भाषाशैली, प्रसंगातील नाट्य शोधण्याची वेधकता इत्यादी वैशिष्टयांमुळे ही कादंबरी रसिकांच्या अपेक्षा खचितच उंचावणारी आहे असे म्हणावेसे वाटते.

**-पंडित टापरे**

---

**'म्हातारीनं झाकला कोंबडा' (कथासंग्रह) : सौ. अनुराधा गुरव; अजब पुस्तकालय, कोल्हापूर; प्रथमावृत्ती १९८२; पृ. १५६; किं. २० रु.**

'म्हातारीनं झाकला कोंबडा' हा प्राध्यापिका सौ. अनुराधा गुरव यांचा दुसरा कथासंग्रह. त्यातील तेरा कथा लेखिकेच्या समृद्ध भावानुभूतीचा आणि विविधरंगी अभिरुचीचा प्रत्यय देऊन जातात. यातील सर्वच कथांना ग्रामीण पार्श्वभूमी देण्याचा लेखिकेचा प्रयत्न दिसतो. परंतु त्या सर्वांना 'ग्रामीण कथा' म्हणता येणार नाही. लेखिकेच्या भावविश्वाचा कानोसा घेता, तिच्या अनुभूतीची जात 'ग्रामीण', 'दलित', 'नागरी' अशा संमिश्र स्वरूपाची

अनुक्रमणिका

असल्याचे या कथावाचनानंतर लक्षात येते. या सर्वच कथांमध्ये उपरोधाच्या अवगुंठणात लपलेली कारुण्याची झिलई मोठी मोहक आहे.

'म्हातारीनं झाकला कोंबडा' ही या संग्रहाचं प्रतिनिधित्व करणारी कथा. आपल्या मुलाने पैलवानकी करून जिल्ह्यात नाव कमवावे यासाठी त्याची आई त्याला (गणपतीला) त्याच्या बायको-पासून (सगुणा) सतत चार हात दूर ठेवते. त्यासाठी तिच्या (सगुणेच्या) 'ओटी भरणा'ची वेळ सासूने (जिजाई–म्हातारीने) कोणासही कळू दिली नाही. पण त्यामुळे मीलनोत्सुक कारुण्य वाढत जाऊन गणपती-सगुणा चोरट्या मीलनाचे क्षण उपभोगतात. सगुणेला दिवस गेल्याचे म्हाताऱ्या जिजाईच्या लक्षात येऊन, ती सगुणेला 'हे काम कुणाचं हाय?' म्हणून माहेरी हाकलून देते. मुलाची कुस्ती जवळ आलेली म्हणूनच म्हातारीने लाडक्या सुनेला सतत झाकून ठेवण्याचा प्रयत्न केला. कोंबडा झाकून ठेवल्याने सूर्योदय व्हायचा थांबतो थोडाच! याच न्यायाने माणूस आपले अंतरंग लपवीत राहिला, तरी सत्य कधीच दडत नसते हे लेखिकेला सांगावयाचे आहे. हे कारुण्यपूर्ण–कठोर सत्य सांगण्यासाठी लेखिकेने औपरोधिक विनोदाचे शस्त्र उत्तम रीतीने वापरले आहे.

'घाव' या कथेतील शामराव कुलकर्णी पहिल्या बायकोची दोन अपत्ये असूनही, चाळिशी उलट-ल्यावर सोळा वर्षे वयाच्या मंगलशी दुसरे लग्न लावतो. घरगडी अंकुशा महाराच्या बहिणीवर शेतात बलात्कार करून, पुन्हा त्याच्या बायकोवर डोळा ठेवलेला. ती मरावी यासाठी प्रयत्न केला. या सर्वांची उबग येऊन मंगलने शामराव कुलकर्ण्याऐवजी अंकुशा महाराकडून आपली कूस उजविण्याचा प्रयत्न केला. त्यापायी शामरावने त्यांना झोपल्याजागी कुऱ्हाडीचे 'घाव' घालून ठार केले. 'बयो, कुक्कू लेवून जा!' कथेतही मुंबईवरून ग्रामीण स्त्रियांची पाहणी करण्यासाठी झालेल्या स्त्रिया खेडुत स्त्रियांची –हिराबाईची–उच्च विचारसरणी ऐकून कशा फजित होतात हे समजते. 'सहभोजन' मध्ये अज्ञानी, गरीब हरिजनांना फसविणारी पांढरपेशी मनोवृत्ती व त्यासाठी कोसळणारे हरिजन दाखविले आहेत. 'लेकराने चोखला. जगाने देखला' या कथेतही बाजाराच्या गर्दीत खेडुत स्त्रीचा 'विनयभंग' कर-णाऱ्या शहरी-नागर वृत्तीचा समाचार घेण्याइतपत खेडुत स्त्री आता धीट बनलेली दिसते. परंतु त्यातही तिची मूक वेदना ठणकताना ऐकू येतेच. 'सोने गवसले! सोने हरपले!!' ही कथा सुशिक्षितांपेक्षा अशिक्षीत माणूस चोरीला किती भितो हे दाखविते. मनाप्रमाणे बायको केली म्हणून 'गिरजा-हैबती'ना एकांतवास न मिळू देणारी सासू व एकांत शोधून आई होणारी 'तांबडी' (कोंबडी) व 'बादशा' (कोंबडा) यांची प्रणयकथा अशीच करुणगर्भ सूक्ष्मतेने भरलेली आहे. तसेच 'गरिबी हटाव' या सरकारी घोषणेतील पितळ उपरोधाने उघड कर-ण्याचा कलात्मक प्रयत्न 'कष्ट सरता सरेना' या कथेत दिसून येतो. अशिक्षित खेडूत स्त्री-पुरुष व सुसंस्कृत नागर मनोवृत्तीच्या स्त्री-पुरुषांच्या 'स्त्री-पुरुष संबंध विषयक' भूमिकेतील फरक 'सावित्री आणि इरावती' या कथेत दाखविला आहे. स्वैर संभोगापेक्षा संयमित प्रीतीतच मांगल्याचे दर्शन होऊ शकते, हे या 'वासनकांडा'चे सूत्र आहे. तीच गोष्ट 'गौरी' या कथेची, वासनकांडाचे भक्ष बनलेल्या 'गौरी' मध्ये निर्व्याज बालमैत्रिणीच्या निरागस वात्सल्याचा झरा अशाही स्थितीत वाहताना दिसतो आहे. त्याने 'प्रतिभा'चे स्त्रीहृदय काळवंडून जाते. 'संस्कार' मधील वीणाबाईंना शाळेतील शिक्षणाच्या अपुरेपणाची जाणीव असह्य होऊन नोकरी सोडावी वाटते. तर 'कोंडमारा' कथेतील हरिजन डॉक्टर-सहदेव अडाणी वडिलांना आपण 'सुखी कुटुंबा'चा मार्ग दाखवू शकलो नाही याची खंत खदखदते आहे. याच्या उलट सुसंस्कृत विनायकराव आपल्या मुलाच्या प्रेमात पडलेल्या कनिष्ठकुलीन 'मुक्ता'च्या कंबरेला 'अजगरा'सारखा विळखा घालून मन बधीर करतात.

अशा रीतीने विनोद, उपरोधातून व्यक्त होणारे कारुण्य वाचकांच्या मानसिक कोलाहलाला कारणी-भूत ठरणारे आहे. लेखिका आपल्या सहृदयतेने स्त्रीमनाच्या अत्यंत सूक्ष्म वेदनांप्रमाणेच पुरुष-जातीच्या सूक्ष्म भावछटाही सहजपणे टिपते. हेच तिचे सामर्थ्य आहे. काही कथा 'दलित' साहित्यात शोभून दिसणाऱ्या असल्या तरी त्यांना 'दलित कथा' म्हणता येणार नाही. त्यातील संवेदना दलित नाहीत.

अनुक्रमणिका

तीच गत ग्रामीणतेची झाली आहे. पार्श्वभूमी ग्रामीण असली तरी अस्सल ग्रामीण संवेदना अभावानेच प्रकटते. लेखिकेला हा हरवलेला सूर सापडला तर ती ग्रामीण साहित्यात मोलाची भर टाकू शकेल. याची साक्ष, 'लेकराने चोखला ... जगाने देखला' आणि 'बयो, कुक्कू लेवून जा !' यांसारख्या कथांतील काव्यात्म कल्पकतेवरून पटावी. ग्रामीण स्त्रीसमाजातील विनोदाची बाजूही तिचे एक शक्तिकेंद्र ठरावे !

– शिवाजीराव चव्हाण

## वाचकांचा पत्रव्यवहार

सन्माननीय संपादक 'नवभारत' ह्यांसी

स. न. वि. वि.

जून १९८२ चा 'नवभारत' चा अंक वाचला. नेहमीप्रमाणेच वाचनीय आहे. 'ग्रंथपरीक्षणे' वाचली, त्यांतील श्रीमती वेदवती करमकर यांची 'बाहुले' व 'तिसरा रस्ता' ह्या श्री. सुधाकर शंकर देशपांडेलिखित पुस्तकांवरील परीक्षणे वाचली. परीक्षणलेखिकेने पुस्तकांच्या विविध अंगांवर बारकाईने नजर फिरवलेली जरूर आढळते; पण परीक्षण हे सुस्पष्ट, आकलनीय असले पाहिजे ह्याचे भान लेखिकेला राहिलेले नाही असे नाइलाजाने म्हणावे लागते. 'बाहुले' च्या परीक्षणात शेवटी शेवटी लेखिका म्हणजे 'एकूण सर्व कथा वाचल्यानंतर असे वाटते की कथा चांगल्या आहेत; पण शैलीबाबत असे म्हणावेसे वाटते, की तालात सर्व गाणे चालले आहे पण सम कुठेच सापडत नाही.' इथे नक्की काय समजायचे? समीक्षापर लेखनात आलंकारिक विधाने सहसा नसावीत आणि असलीच, तर त्यामुळे प्रतिपाद्य विषय सुस्पष्ट तरी व्हावयास पाहिजे. तसे येथे होत नाही. उलट वाचक बुचकळ्यात मात्र पडतो. इथे ताल म्हणजे काय; तसे सम म्हणजे काय समजायचे, ह्याचा बोध होत नाही. हे सर्व समजून घेण्याची तीव्र इच्छा मात्र निश्चितच आहे...

– प्रकाश गणेश करमरकर

## साभार पोच

* **जोशीपुराण** – श्री. ज. जोशी; श्री विद्या प्रकाशन, पुणे; १९८२; पृ. २४८; किं. ३० रुपये.
* **टाहो** (नाटक) – त्र्यं. वि. सरदेशमुख; सुपर्ण प्रकाशन, पर्वती, पुणे ४११००९, १९८२; पृ. ६३; किं. रु. १०.५०
* **काळोखाचे थेंब** (कथासंग्रह) – प्रभाकर नारायण परांजपे; सुपर्ण प्रकाशन, पर्वती, पुणे ४११००९; १९८२; पृ. १११; किं. १८ रुपये.
* **निळ्या पहाडाच्या कविता**– बापूराव जगताप; कला प्रकाशन, औरंगाबाद; १९८२; पृ. ५५; किं. १५ रुपये.

# सार-संकलन

## पंतप्रधानांची अमेरिकेला भेट

### ही भेट अमेरिकेला कशी दिसली ?

भारतातून येणाऱ्या ह्या 'उतारू' विषयी (ती अमेरिकेत दाखल होण्यापूर्वी) 'न्यूयॉर्क टाइम्स' मध्ये प्रसिद्ध झालेले एक टिपण असे होते : "आंतर्राष्ट्रीय व्यवहारात अमेरिका आणि भारत यांना भागीदार म्हणून वागायला खूपच कारणे आहेत– इहवादी लोकशाहीवरील विश्वास, भरभराटीला आलेला व्यापार, भू-राजकीय (जिओ-पोलिटिकल) परिस्थितीपासून उद्‌भवणारी समान उद्दिष्टे. त्यांच्यामध्ये जो बेबनाव आहे त्याला क्षुद्र उखाळ्या-पाखाळ्यांपलीकडे काही कारण नाही.

इंदिरा गांधी याचक म्हणून येत नाहीत किंवा आज ह्या दोन देशांमध्ये कोणतेही मोठे, प्रखर वादंग माजून राहिलेले नाही. ... तेव्हा राष्ट्राध्यक्ष रीगन यांना ह्या भेटीचा फायदा घेऊन दोन देशांमध्ये बराच काळ विवाद्य ठरलेल्या काही गोष्टी झटकून बाजूला सारता येतील– उदा. तारापूर अणुभट्टीला समृद्धित युरेनियमचा पुरवठा करण्याविषयीचा आठ वर्षे चालत आलेला वाद किंवा अमेरिकेचे पाकिस्तानशी आणि भारताचे सोव्हिएट रशियाशी असलेले संबंध आणि त्यांतून निर्माण होणाऱ्या परस्परांविषयीच्या शंकाकुशंका.

पण ह्या भेटीच्या कार्यक्रमपत्रिकेवरील सर्वांत महत्त्वाचा विषय म्हणजे ह्या दोन देशांमधील संबंधांना अनुकूल असे मानसिक वातावरण या दोन्ही देशांत कसे घडविता येईल. बहुतेक अमेरिकन व्यक्तींच्या मनांत भारताचे जे चित्र असते ते भारत म्हणजे भुकेकंगाल दारिद्र्याचे एक मोठे आगर होय ह्या स्वरूपाचे असते. पण हे चित्र आता कालबाह्य झाले आहे. भारत आता स्वतःला पुरेसा अन्नपुरवठा करू शकणारा एक औद्योगिक देश बनला आहे. अमेरिका आणि भारत यांच्यांत राजकीय तणाव असले तरी आज अमेरिका हा भारताचा सर्वांत मोठा राजकीय भागीदार आहे. त्यांच्यामधील वार्षिक व्यापार रु. २४०० कोटींच्या आसपास आहे. आणि इंदिरा गांधींचा जो समाजवाद आहे त्याच्यात 'खुल्या बाजारा'च्या धोरणांचा बराच मसाला मिसळलेला आहे.

भारताचे सोव्हिएट रशियाशी जे संबंध आहेत त्यांच्या स्वरूपाची काहीशी चिंता अमेरिकेला आहे. १९७१ मध्ये भारताने रशियाशी 'मैत्री करार' केला आणि त्यानंतर थोडयाच अवधीत झालेल्या भारत-पाक युद्धात अमेरिकेने आपला 'कल' पाकिस्तानकडे झुकविला होता. ह्या मैत्री कराराचे एक फलित असे: भारत रशियाला अनेक उपभोग्य वस्तूंचा स्वस्त दरात पुरवठा करतो– ह्या वस्तू भारत पाश्चात्त्य जगात विकू शकणार नाही– आणि त्यांच्या बदल्यात रशिया भारताला शस्त्रास्त्रे पुरवितो. ही शस्त्रास्त्रें भारताला अन्यत्र इतकी स्वस्त आणि इतक्या सुलभतेने मिळू शकणार नाहीत. शिवाय रशिया भारतीय कम्युनिस्ट पक्षाला आवरून धरतो हा भारताला मिळणारा बोनस होय.

ह्यामुळे अफगाणिस्तानवर रशियाने केलेल्या आक्रमणाविषयी बोलताना इंदिरा गांधींवर काही बंधने पडतात. त्यांच्याकडून ह्या आक्रमणाचा स्पष्ट निषेध अजून व्हायचा आहे. भारताचे रशियावर असलेले हे परावलंबित्व कमी करणे हे अमेरिकन धोरणाचे एक सततचे उद्दिष्ट असले पाहिजे. ह्यासाठी आण्विक उर्जेचा दुरुपयोग होऊ नये यासाठी आवश्यक असलेल्या खबरदारीत ढिलाई येऊ न देता भारताला हवे असलेले आण्विक इंधन त्याला पुरविण्याचा मार्ग अमेरिकन शासनाने शोधून काढला पाहिजे. पाकिस्तानला एफ्–१६ जातीची ४० विमाने पुरविण्याचा निर्णय अमेरिकेने घेतला आहेच. आता पुढे जाऊन ह्या विमानांची संख्या दुप्पट करण्यात येणार आहे अशा ज्या अफवा उठत आहेत,

त्यांचे निराकारण करून भारताला ह्याविषयी वाटणारी न्याय्य भीती सौम्य करण्याची तत्परता अमेरिकेने दाखविली पाहिजे.

श्रीमती गांधींविषयी असे म्हणता येईल, की ह्या दहा दिवसांच्या भेटीचा जास्तीत जास्त लाभ त्यांना उठवायचा आहे, हे स्वच्छ आहे. त्यांच्या गेल्या भेटीविषयी लिहिताना "एक जबरदस्त आणि जितकी जबरदस्त तितकीच आढ्यताखोर स्त्री" असे हेन्री किसिंगर यांनी नमूद केले होते. पण त्यावेळी अमेरिकन धोरणाविषयी इंदिरा गांधी यांना वाटणारा तिरस्कार लपविणे त्यांना अशक्यप्राय होते. पण १९७१ नंतर बऱ्याच गोष्टी घडून गेल्या आहेत. १९७५–७७ मध्ये त्यांनी लोकशाही स्थगित केली आणि ते घसमुसळेपणाचे कृत्य होते. पुढे त्यांचा निवडणुकीत पराभव झाला आणि १९७९ मध्ये मोठा विजय संपादून त्या सत्तेवर परतल्या. त्यांच्या आवडत्या पुत्राचे अपघाती निधनही पुढे घडून आले.

आज जगाच्या सर्वांत मोठ्या लोकशाही देशाच्या लोकांनी मुक्तपणे निवडलेल्या पंतप्रधान म्हणून त्या सत्तास्थानावर परतल्या आहेत. भारताला शस्त्रास्त्रे जरी पूर्वेकडून मिळत असली तरी राज्यपद्धतीविषयीच्या त्याच्या कल्पना त्याला पश्चिमेकडून लाभल्या आहेत आणि त्याची स्वतःची जी स्वाभिमानी संस्कृती आहे तिचा मास्कोशी काही संबंध नाही. भारताने जी राजकीय प्रगल्भता दाखविली आहे– जिच्यावर अमेरिका विसंबून राहते– ती दक्षिण आशियात स्थैर्य टिकून राहण्याच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाची अशी गोष्ट आहे. म्हणून आपले म्हणणे लक्षपूर्वक ऐकून घेतले जाण्याचा इंदिरा गांधींना अधिकार आहे."

ह्या भेटीची पार्श्वभूमी अशी सांगण्यात येते: रीगन यांची अमेरिकेचे राष्ट्राध्यक्ष म्हणून निवडणूक झाल्यानंतर इंदिरा गांधी यांनी रीतीप्रमाणे त्यांना अभिनंदनाचा संदेश पाठविला. पण त्यानंतर काही आठवड्यांनी त्यांनी राष्ट्राध्यक्षांना दुसरे अभिनंदनपर पत्र पाठविले आणि त्याच्यात आपल्या दोन देशांतील संबंध अधिक सख्याचे होतील अशी आशा व्यक्त केली. हे पत्र अमेरिकन अधिकारी वर्तुळाला अर्थपूर्ण वाटले. यानंतर ह्या दोन नेत्यांत बराच पत्रव्यवहार झाला आणि तो बराचसा जिव्हाळ्याचा होता. गेल्या वर्षी कानकुन, मेक्सिको येथे झालेल्या विकसित व अविकसित देशांच्या परिषदेच्या वेळी त्यांची जी खाजगी चर्चा झाली तिच्यातून स्नेहाचे एक नातेही दोघांत निर्माण झाले. पण दोघा देशांमधील संबंधांत, वस्तुनिष्ठ दृष्टचा पाहता, जे तणाव होते त्यांचे निराकरण करणे सोपे नाही ही जाणीवही दोन्ही देशांतील अधिकारी वर्गांत होती.

औपचारिक चर्चेत ज्या समस्यांचा विचार होणे अटळ होते त्यांतील एक म्हणजे आंतर्राष्ट्रीय विकास यंत्रणेकडून (इंटरनॅशनल डेव्हलपमेन्ट एजन्सी) भारताला मिळू शकणारे कर्ज ही होय. ही यंत्रणा जागतिक बँकेने उभारली आहे आणि गरीब देशांना विकासासाठी कमी दराने कर्ज देण्याचे काम ती करते. कार्टर प्रशासनाने १९८२ व १९८३ या वर्षांसाठी वार्षिक १००.८ कोटी डॉलर्स एवढी रक्कम ह्या यंत्रणेसाठी अनुदान म्हणून मंजूर केली होती. रीगन प्रशासनाने ती ह्या वर्षासाठी ७० कोटी आणि पुढल्या वर्षासाठी ९४.५ कोटी एवढी कमी केली. यामुळे भारताला मिळू शकणाऱ्या कर्जात १५ टक्के एवढी घट होईल. ह्या संबंधात राष्ट्राध्यक्ष रीगन भारताचे युक्तिवाद शांतपणे ऐकून घेतील, पण काही करणार नाहीत अशी अमेरिकन अधिकाऱ्यांची अपेक्षा होती.

भारताचा या संबंधातील युक्तिवाद असा आहे की भारताने, स्वतंत्र झाल्यापासून, तंत्रज्ञानाच्या आणि आर्थिक साहाय्याच्या बाबतीत पूर्णपणे व्यावहारिक असे धोरण स्वीकारलेले आहे. राजकीय विचारप्रणालीची (आयडियालॉजी) छाया त्याच्यावर पडलेली नाही. पोलाद कारखाने उभारण्यासाठी जे सोव्हिएट साहाय्य घेण्यात आले ते अमेरिका आणि पश्चिम जर्मनी यांनी हे साहाय्य करण्याचे नाकारल्यानंतर घेण्यात आले आणि ह्या देशांनी साहाय्य करायला जो नकार दिला तो हे कारखाने सार्वजनिक मालकीचे होणार होते ह्या कारणावरून दिला.

आंतर्राष्ट्रीय विकास यंत्रणेकडून भारताला जे कर्ज पाहिजे आहे ते औद्योगिक 'अधोरचना' (इन्फ्रास्ट्रक्चर) अधिक मजबूत करून तिचा विस्तार करण्यासाठी. वीज, रेल्वे, दळणवळणाची इतर साधने,





टेलिफोन इ. सेवा अधिक कार्यक्षम झाल्याशिवाय परकीय भांडवलाला मोठ्या प्रमाणावर आकर्षित करून घेता येणार नाही. कालवे आणि पाटबंधारे यांच्यासाठीही हे कर्ज आवश्यक आहे. मान्सूनवरील देशाचे अवलंबित्व कमी केल्याशिवाय आर्थिक विकासाला गती येऊ शकणार नाही.

दुसरी महत्त्वाची समस्या म्हणजे तारापूर अणुभट्टीला अमेरिकेकडून व्हावयाचा समृद्धित युरेनियमचा पुरवठा. भारताचे म्हणणे असे की १९६३ च्या कराराप्रमाणे हा पुरवठा करायला अमेरिका बांधलेली आहे. कार्टर आणि रीगन प्रशासनांचे म्हणणे असे की भारताने १९७४ मध्ये केलेल्या आण्विक चाचणीनंतर अमेरिकन काँग्रेसने जो कायदा केला आहे त्याच्याप्रमाणे जे देश आपल्या आण्विक साधनसामग्रीचे आंतर्राष्ट्रीय यंत्रणेकडून पर्यवेक्षण करून घ्यायला तयार नसतील त्यांना आण्विक इंधन पाठवायला बंदी आहे. ह्या अडचणीतून मार्ग काढता येईल की नाही याविषयी भेटीपूर्वी बरीच शंका होती.

परंतु आर्थिक क्षेत्रात भारत आणि अमेरिका यांच्यांत आज आहे त्यापेक्षा अधिक निकटचे सहकार्य होऊ शकेल अशी आशा वाटण्याजोगी परिस्थिती होती. भारताच्या परराष्ट्रीय व्यापारात मोठी घट असल्यामुळे मागे भारताला आयातीवर बंधने घालणे भाग होते. १९७९ मध्ये जगभर तेलाच्या किंमतीत जो मोठी वाढ झाली तिच्यामुळे ही परिस्थिती अधिकच बिघडली. ह्यामुळे भारताला आंतर्राष्ट्रीय नाणेनिधीकडून ६०० कोटी डॉलर एवढे कर्ज घ्यावे लागले. ह्या कर्जाच्या पहिल्या वार्षिक हप्त्याला अनुमती देण्याचा प्रश्न जेव्हा नाणेनिधीच्या संचालक मंडळापुढे आला, तेव्हा मंडळावरील अमेरिकन प्रतिनिधी तटस्थ राहिला. ह्याचे कारण असे की भारतात आर्थिक व्यवहारावर जी नियंत्रणे आहेत ती सैल करण्याचे धोरण भारताने स्वीकारले पाहिजे असे अमेरिकेचे मत होते आणि भारत हे धोरण अमलात आणील की नाही याविषयी अमेरिकेला शंका होती. परंतु दुसऱ्या वार्षिक हप्त्याच्या वेळी अमेरिकन प्रतिनिधीने भारताला अनुकूल मत दिले. ह्याचे कारण मध्यंतरात भारताने आर्थिक नियंत्रणांविषयी अधिक उदार धोरण स्वीकारले होते असे अमेरिकेला आढळून आले होते.

तेलाच्या बाबतीत अधिक स्वयंपूर्णता मिळविण्यासाठी भूगर्भातील तेल शोधून काढण्याचे प्रयत्न भारताने नेटाने चालू ठेवले आहेत आणि ह्यासाठी त्याला अमेरिकेच्या तांत्रिक साहाय्याची आवश्यकता आहे. यांत्रिक अवजारे (मशिन टूल्स) आणि विद्युत्-यांत्रिकी (इलेक्ट्रॉनिक्स) ह्या औद्योगिक क्षेत्रांत विकास साधण्यासाठीही प्रगत अमेरिकन तंत्रज्ञान भारतात आयात करणे जरुरीचे आहे. तेव्हा एकंदरीत अमेरिकन तंत्रज्ञान, भांडवली गुंतवणूक आणि आर्थिक पाठिंबा यांचा लाभ होणे भारताच्या दृष्टीने अतिशय महत्त्वाचे आहे. पण या गोष्टी भारताच्या दृष्टीने नेहमीच महत्त्वाच्या होत्या. मग ह्या घडीला इंदिरा गांधींनी पुढाकार घेऊन अमेरिकेशी अधिक सामंजस्य प्रस्थापित करण्याचा प्रयत्न का केला असेल? ह्या प्रश्नाचे अमेरिकन उत्तर असे की सोव्हिएट रशियाने अफगाणिस्तानात जे ठाण दिले आहे त्यात भारताच्या सुरक्षिततेला अभिप्रेत असलेला धोका भारताला जाणवत आहे. हा धोका असूनही भारताने सोव्हिएट रशियाने अफगाणिस्तानाविरुद्ध केलेल्या आक्रमणाचा स्पष्टपणे निषेध केलेला नाही. यावरून आणि भारताच्या कंबोडियाविषयीच्या धोरणावरून भारत सोव्हिएट रशियाच्या प्रभावाखालील देश आहे की काय अशी शंका आंतर्राष्ट्रीय संबंधांच्या क्षेत्रात घेण्यात येऊ लागली आहे. अलिप्त राष्ट्रांच्या गटाचा एक नेता म्हणून भारताला ही 'प्रतिमा' परवडण्यासारखी नाही. तेव्हा अमेरिकेशी मैत्रीचे संबंध प्रस्थापित करून आपल्या आंतर्राष्ट्रीय पावित्र्यात काहीसा समतोल निर्माण करणे भारताला आवश्यक झाले आहे.

ते काही असो. भेट सौहार्दाच्या वातावरणात पार पडली. याप्रसंगी होणारी भाषणे औपचारिक असतात आणि म्हणून त्यांतील विधाने औपचारिक असतात आणि म्हणून त्यांतील विधाने शब्दशः घ्यायची नसतात हे मान्य करूनही अशा भाषणांत त्या, त्या देशाच्या परराष्ट्रीय धोरणाचा प्रमुख रोख प्रतिबिंबित झालेला असतो ह्याकडे दुर्लक्ष करता येत नाही. ह्या दृष्टीने रीगन यांच्या भाषणाचे विश्लेषण केले तर अमेरिकेच्या दृष्टीने, भारताच्या

संदर्भात, विशेष महत्त्वाच्या असलेल्या आंतरराष्ट्रीय समस्या कोणत्या आहेत. याचे इंगित मिळते. इंदिरा गांधींना उद्देशून रीगन म्हणतात, "... आपल्या दोघा देशांत मतभेद आहेत हे आम्ही स्वीकारतो; पण आपल्या दोघांत जे समान आहे त्याच्यावर ह्याची काळोखी छाया पडू देता कामा नये. आपण दोघे बलिष्ठ, अभिमानी आणि स्वतंत्र राष्ट्रे आहोत. स्वतःच्या राष्ट्रीय हिताची आपली जी कल्पना असेल तिला अनुसरून आपण वागतो. आपल्या दोघांनाही हिंदी महासागरात स्थैर्य आणि शांतता नांदायला हवी आहे. रशियाने आज अफगाणिस्तान जो व्यापला आहे त्याचा शक्य तितक्या लवकर शेवट व्हावा अशीच आपली इच्छा आहे. मध्यपूर्वेत समान न्यायावर आधारलेली शांतता प्रस्थापित व्हावी आणि इराक-इराण विवादात सन्माननीय समझोता व्हावा अशी आपणा दोघांचीही इच्छा आहे. आंतर्राष्ट्रीय आर्थिक सहकार्याकडे आपण दोघेही विधायक दृष्टीने पाहतो. अमेरिका व भारत यांच्या अर्थव्यवस्थांमध्ये आजही जे मजबूत दुवे सांधले जात आहेत त्यांच्या पायावर भविष्यात आपल्याला बांधणी करायची आहे."

ह्या भाषणात भारताला आपले वेगळे, स्वतंत्र परराष्ट्रीय धोरण आखण्याचा अधिकार आहे हे मान्य करण्यात आले आहे; पण अमेरिका–भारत संबंधांच्या संदर्भात भारताने कोणत्या आंतरराष्ट्रीय समस्यांची दखल घेतली पाहिजे आणि ती कोणत्या दिशेने घेतली पाहिजे असे अमेरिकेला वाटते त्याची सूचना दिली आहे. इंदिरा गांधी यांनी आपल्या प्रत्युत्तरात ह्या समस्यांना अजिबात स्पर्श केला नाही अनेक वंशांच्या लोकांना सामावून घेणाऱ्या आणि बुद्धिमंतांना आणि साहसप्रिय व्यक्तींना नेहमीच आकर्षून घेणाऱ्या अमेरिकन समाजाच्या उत्साही आणि गतिमान इतिहासाचा, तसेच अमेरिका आज एक जागतिक महाशक्ती आहे ह्या वस्तुस्थितीचा त्यांनी गौरवाने उल्लेख केला. पण त्याबरोबरच भारत स्वतःकडे कोणत्या दृष्टीने पाहतो तेही स्पष्ट केले. "इतरांवर प्रभाव कसा टाकावा हा आमच्यापुढील प्रश्न नाही. आमच्या राजकीय आणि आर्थिक स्वातंत्र्याचा परिपोष कसा करावा हा आमच्या पुढील प्रश्न आहे. आमचा स्वातंत्र्यावर जो विश्वास आहे त्याची उत्कटता ज्यांना स्वातंत्र्य नाकारण्यात आले आहे त्यांनाच समजू शकेल. आमचा समतेवर विश्वास आहे कारण आमच्यामधील कितीतरी जणांना खूप काळ समतेपासून वंचित करण्यात आले होते. मानवी व्यक्तीच्या मूल्यावर आमचा विश्वास आहे कारण तो आमच्या लोकशाहीचा आणि विकासाच्या कार्याचा आधार आहे. ही आमच्या राष्ट्रीय कार्यक्रमाची चौकट आहे... सबंध जगाविषयी आणि जागतिक घडामोडींविषयी आम्हाला आस्था आहे; पण जागतिक सत्ता काबीज करण्यात आम्हाला गुंतायचे नाही. त्यातून आमचे काही भले होणार नाही आणि जागतिक शांततेलाही त्यामुळे बळकटी येणार नाही.

आमचा मैत्रीचा हात आम्ही सर्वांच्या पुढे केलेला आहे. एक मैत्री दुसऱ्या मैत्रीच्या आड येत नाही. ही आमची नवी भूमिका नाही..."

ह्या भाषणात भारताच्या अलिप्ततावादी धोरणाचा पुनरुच्चार आहे आणि ज्या मध्यवर्ती राष्ट्रीय उद्दिष्टांवर ते आधारलेले आहे ती स्पष्ट करण्यात आली आहेत.

तेव्हा दोन्ही नेत्यांनी आपापल्या राष्ट्राच्या परराष्ट्रीय धोरणाची स्पष्टपणे पण आर्जवाने फिरून मांडणी केली. ही गोष्ट अर्थात अपेक्षितच होती. परंतु बोलणी अतिशय सौहार्दपूर्ण वातावरणात झाली, दोन्ही बाजू मोकळेपणे मांडण्यात आल्या असा निर्वाळा दोन्ही पक्षांच्या अधिकारीवर्गाने दिला. ह्याचे फलित पुढे दिसून येईलच.

ताबडतोब हाती लागलेले एक फळ म्हणजे १९६३ च्या आण्विक कराराच्या अमलबजावणीच्या बाबतीत करण्यात आलेली तडजोड. ही अशी की, जरी अमेरिका भारताला, कायद्यातील अडचणीमुळे समृद्धित युरेनियम पुरविणार नाही तरी फ्रान्स ते पुरवील आणि आंतर्राष्ट्रीय देखरेखीविषयीच्या ज्या अटी त्या कराराप्रमाणे भारतावर बंधनकारक आहेत त्या भारत पाळील. पण ही तडजोड होते न होते तोच एक अडचण उपस्थित झाली आहे. ह्या करारात अंतर्भूत असलेल्या अटींचा अर्थ कसा लावायचा ह्याविषयी अमेरिका आणि भारत ह्यांच्यांत मतभेद आहे हे उघडकीला आले आहे.

अनुक्रमणिका

‘ नवभारत ’ वर्ष ३५ वे अंक १ ते १२ (ऑक्टोबर १९८१ ते सप्टेंबर १९८२)

# लेखक-सूची ( अकारविल्हे )

अ. ना. ठाकूर










